# माझी विलायतची सफर

लेखक

विठ्ठल केशवराव कोरटकर
एल्‌एल्. बी. ( यु. वेल्स )

किंमत १॥ रुपया

# स्वागत

विलायतेला काय, जाणारे हल्लीं शेंकडोशें झाले आहेत! अशा प्रत्येक प्रवाशानें आपलें प्रवासवर्णन लिहिण्याचें मनांत आणलें तर किती तरी पुस्तकें तयार होतील! पण त्या प्रत्येक पुस्तकांत नवीन असें काय वाचकांस वाचावयास किंवा मनन करावयास मिळेल? लेखकाच्या अंगीं जर तशी उच्च दर्जाची कला असेल तर मात्र गोष्ट वेगळी! साध्याच विषयांतला मोठा आशय, जो इतरांना कधींच दिसत नाहीं तो, तो प्रगट करील आणि आपण त्याच्या लेखनानें मोहून जाऊं किंवा चकित होऊं. एरवीं त्याच वाटेनें, तशाच बोटींतून, आणि तेवढ्याच थाटानें जाणारे प्रवासी निरनिराळें असें काय सांगणार कीं जें वाचण्यास आपणांस उत्कंठा वाटेल?

एकेकाळीं विलायतेला जाणें म्हणजे कांहींशी अपूर्वाईची गोष्ट होती. आतां तशी स्थिति नाही. अनेकांनीं केलेलीं आपल्या विलायतेच्या सफरींचीं मोठमोठीं वर्णनात्मक पुस्तकें आपणांसमोर आहेत. पावगींनीं आपला ' विलायतचा प्रवास ' लिहिला तो काळ निराळा होता. आजहि तें पुस्तक अभ्यासासाठीं नेमलें जातें. कारण पावगींची संस्कृतशब्दघटित चमत्कृतिजनक लेखनपद्धति हें होय. चिटणीसांचें किंवा राजेसाहेब भोर यांचीं सचित्र विलायतप्रवासाचीं पुस्तकेंहि आपणांस माहितीच्या दृष्टीनें उपयोगी पडण्यासारखीं आहेत.

मग विठ्ठलराव कोरटकरांनीं हा प्रयत्न कां केला? आणि त्याला प्रस्तावना लिहिण्याची विनंती मला कां केली? विलायतेच्या प्रवासाची माहिती पुरवावी हा कांहीं त्यांचा अर्थातच उद्देश नाहीं. एक गोष्ट खरी आहे कीं, आपल्या इष्टमित्रांत आपण आपल्या रोजच्या प्रवासाच्या गोष्टीहि पोटभर बोलतो. किंबहुना तसें केल्याशिवाय आपल्याला चैनच पडत नाहीं. तेव्हां अशा आपल्या इष्टमित्रांपैकीं ज्यांना हा आनंद उपभोगतां आला नाहीं त्यांना थोडी फार तरी आपली आठवण रहावी हा एक उद्देश विठ्ठलरावांचा असला पाहिजे असें आपणांस समजतां येईल.

पण एवढाच कांहीं त्यांच्या मनांतला हेतू दिसत नाहीं. विठ्ठलरावांच्या या विलायतेच्या सफरीं ' त कांही विशेष आहेत. विठ्ठलरावांचे साधुस्वभाव वडील कै. न्या. मू. केशवराव यांनीं धन आणि कीर्ति यांची भरपूर जोड करून ठेविली होती. तेव्हां, विलायतेला जाऊन येणें कांहीं विठ्ठलरावास विशेष जड नव्हतें. पण विठ्ठलरावांना जर मित्रांनीं डिवचलें नसतें तर त्यांच्या मनानें उचल केली नसती आणि विलायतेची वारी त्यांना कदाचित् घडली हि नसती. तेव्हां विठ्ठलरावांना आला असा योग जरा क्वचित् येणाऱ्यांपैकींच म्हटला पाहिजे. आणि त्यांची ही सफर वाचून त्यांच्या सारखी अनुकूलता असणाऱ्या दुसऱ्या कोणास हि तशी प्रेरणा झाली तर तो लाभ कांहीं कमी आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. असा लाभ घडावा आणि घडवून घ्यावा असा हेतू इतक्या वर्षांनीं हें वृत्त प्रसिद्ध करतांना विठ्ठलरावांच्या मनांत डोकावून गेलाच नसेल असें नाहीं.

दुसरा हा हि एक विशेष त्यांच्या या सफरींत आढळतो. विठ्ठलराव विलायतेस गेले ते असे एकदम आणि परत आले ते हि एकाएकीं! सुखदुःखाची ही अशी अचानक भेट किती चमत्कारिक म्हणावी लागेल! पण तें असो! विलायतेस विठ्ठलराव पोंचले खरे, पण पुढें काय? पक्की आखणीच नव्हती. अखेर त्यांस इंग्लंड सोडून वेल्स देश गांठावा लागला! इंग्लंडमध्यें गेलेले आणि जाणारे पुष्कळ, पण शिक्षणासाठीं वेल्स् देश ज्यांच्या वाट्याला येतो असें आपल्यांतले किती? आणि विठ्ठलरावांचा हा वेल्स-योग मग अपूर्वाईचाच म्हणावयास नको काय? बरें, तेथें ते कांहीं चारआठ दिवस राहून फेरफटका करून आले असें थोडेच होते? गेलेच मुळीं अभ्यासासाठीं!

मग राहावें लागलें चार वर्षें ! कोणाला खरें वाटणार नाहीं, पण इंग्लंडचा भाग वाटणारा हा वेल्स् देश परंतु येथले लोक वंशानें आणि भाषेनें इंग्लिशांपेक्षां निराळे आहेत ! आणि आपण येथें इंग्रजींची एवढी प्रशंसा गातो ना, पण वेल्स मधील लॉईड् जार्ज् सारखे इंग्लंडचे मुख्य प्रधान आणि इंग्रजी भाषेचे नामांकित वक्ते सुद्धा आपल्या वेल्श् मातृभाषेचा जाज्वल्य अभिमान बाळगितात ! पण तेथें कोणी त्यांस भाषौदार्याचें तत्त्वज्ञान सांगूं धजत नाहींत, कोणी त्यांस संकुचित म्हणत नाहीं, मागासलेले, बुरसटलेले म्हणण्यास सरसावत नाहीं आणि मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें त्यांचे अंगावर चढविण्यास संकोचत नाहीं ! किती बोध घेण्यासारखा आहे आपण या अशा गोष्टींपासून ? 'महाराष्ट्र साहित्य पत्रिकेंत' एका संपादकीय स्फुटांत तिकडील वेल्श्देशीयांच्या वेल्श् भाषाभिमानाचें उदाहरण मी एकवार मुद्दाम विवेचिलें होतें.

असो ! अशा वेल्श् देशांत विठ्ठलराव राहिले ! या छोट्या सफरींत कांहीं वेल्श् लोक, भाषा, आणि त्यांचा आणि इंग्रजाचा झालेला मेळ यांची उद्बोधक चर्चा विठ्ठलरावांनी केलेली नाहीं. पण त्यांनी तशी केली असती तर ती फारच उपयुक्त व मार्गदर्शक झाली असती यांत संशय नाहीं.

विठ्ठलरावांचे वडील हि विठ्ठलराव असतांना विलायतेस येऊन गेले हा उभयता पितापुत्रांच्या आयुष्यांतला एक चमत्कृतिजनक रमणीय प्रसंग ! विठ्ठलरावांच्या आयुष्यांतील हे प्रसंग पाहिले म्हणजे त्यांत सांगण्यासारखें कांहींतरी आहे यांत कोणासहि संशय वाटणार नाहीं. आणि परदेशांत झालेली आपल्या वत्सल आणि कीर्तिमान वृद्ध पित्याची भेट हीच विठ्ठलरावांची आणि त्यांची आयुष्यांतील शेवटची भेट ठरावी हाहि प्रसंग तरी पुनः किती चमत्कारिक, शोककारक, करुणास्पद पण चमत्कृतिपूर्ण म्हटला पाहिजे !

विठलरावांना एकदम विलायतेस जावें लागलें; आणि एकदमच विलायत सोडावी लागली ! एवढें जगप्रसिद्ध पॅरिस शहर, परंतु त्यांस त्याचें पुरतें दर्शन सुद्धां घेतां येऊं नये ? किती विषाद वाटला असेल त्यांना ? पण तेवढ्यांतहि तेथील नग्नविलासगृहांची कुंटणगिरी करणारा एक भारतीय त्यांस भेटावा ही तरी काय गोष्ट म्हणावी ? या निमित्तानें आणि एकंदर पाश्चिमात्य जीवनासंबंधानें विठ्ठलरावांच्या मनावर घडलेले परिणाम हि त्यानीं थोडक्यांत सूचित केले आहेत.

कै. न्या. मू. केशवराव यांचा माझा परिचय केशवरावांच्या सार्वजनिक सेवाप्रेमामुळें सुमारें १९१४।१५ त आला आणि तो त्यांच्या देहान्तपर्यंत वाढत गेला! हैदराबादेंत एक महिनाभर राहिलों तेव्हां केशवरावांनीं मजबरोबर जातीनें हिंडून आमच्या शिक्षण प्रसारकमंडळीच्या न्यू पूना कॉलेजसाठीं सुमारें ४।५ हजार मिळवून दिले त्या प्रसंगाची आणि त्याच्या सौजन्यशाली आणि कष्टाळू स्वभावाची आणि मधुर सहवासाची स्मृति माझ्या हृदयांत अद्यापि ताजी आहे! चि. विठ्ठलराव पुण्यास शिक्षणासाठीं राहिले तेव्हां त्यांचा माझा संबंध वडिलांच्या या स्नेहामुळें आला आणि याच स्नेहतंतूचें बळ पडून ही प्रस्तावना मजकडून लिहून मागण्याचा आपला सर्वमान्य हक्क चि. श्री. विठ्ठलराव यांनीं बजाविला.

छोट्याशा ग्रंथाला प्रस्तावना आणखी लांबविणें योग्य होणार नाहीं. ही सफर लिहिली तसे आणखी हि आपले अनुभव विठ्ठलरावांनी वाचकांस सादर करावे अशी इच्छा व्यक्त करून पुरें करतो.

आश्विन शु. ४।६८<br>
२८।९।४६<br>
'लोककल्याण', पुणें.

दत्तो वामन पोतदार

# माझी विलायतची सफर

## पूर्व तयारी

पुण्यास असतांना कॉलेजच्या मित्रमंडळींनीं एके दिवशीं माझी खूप थट्टा केली. या वेळीं माझे धाकटे बंधू लंडन येथें होते. "लहान बंधु विलायतेंत आणि तूं येथेंच रडतराऊतासारखा बैस, तुझ्यांत हिंमतच नाहीं" असें एकाचें बोलणें चालू असतांना मीं म्हटलें, "त्यांत काय मी सुद्धां जातों." दुसऱ्या मित्रानें तावडतोब एका कार्डावर वडिलांस पत्र लिहावयास लाविलें. घरून त्या पत्राचें उत्तर 'तयारी करा' असें येतांच मी विलायतेला जाण्याच्या तयारीस लागलों. काय शिकावयाचें, कोठें रहावयाचें वगैरे कांहींच ठरविलें नव्हतें. तीन आठवड्यांच्या आंत मला हैद्राबादेच्या रेसिडेंटकडून Pass-Port परवाना मिळाला. हिंदुस्तानी लोकांना इटालियन बोटीनें प्रवास सोइस्कर पडतो असें कांहीं लोकांचें मत पडलें म्हणून मी लॉइड ट्रिस्टीनोॲड मारिटाना इटालियाना कंपनीच्या S. S. Pilasna 'पिल्स्ना' बोटीनें निघावयाचें ठरविलें.

परदेशास जातांना आपण तेथें उत्कृष्ट रीतीनें आपला कार्यक्रम पार पाडूं, आपले दिवस सुखांत जातील, आपल्याला नवे नवे देश पहावयास मिळतील, युरोपांतील लोकांच्या सहवासानें आपणांस त्या लोकांच्या राहणीसंबंधीं माहिती होईल, एकंदरींत एकप्रकारचें नाविन्य आपल्या अनुभवास येईल, दृष्टि विस्तृत होईल या कल्पनेनें मन रंगून गेलें होतें. प्रवासांत होणाऱ्या त्रासाची कल्पना मुळींच आली नाहीं. पण घर सोडतांना मात्र मन एकदम विव्हल होऊन गेलें. अगदीं आयत्यावेळीं माझा निश्चय ढांसळूं लागला. मनस्थिति चमत्कारिक झाली.

मीं माघार घेतली. पण माझे वडील माघार घेईनात. माझें मन मात्र हेलकावे खाऊं लागलें. वडिलांनीं माझ्या खर्चाची रक्कम सुद्धां बँकेंत जमा केली होती. हैद्राबादचे श्रीयुत, बॅरिस्टर रामचंद्र नाईक यांच्याकडे मोठी पार्टिंग फीस्ट झाली. यावेळीं असिस्टंट रेसिडेंटही हजर होते. अखेर लटकेंच धैर्य दाखवीत मीं हैद्राबाद सोडलें. मुंबईहून बोट २९ ऑगस्ट १९२८ ला निघणार होती. वाटेंत पुण्यास एक दिवस मुक्काम केला. पुण्याच्या मित्रमंडळींनीं हंसत हंसत निरोप दिला. माझ्याबरोबर हैद्राबादचे आणखी दोन विद्यार्थी श्री. शिवेंद्रबहादूर आणि बिहारीलाल हे होते. बोट सुटावयाचे दिवशीं वडील हैद्राबादेहून वेळेवर येऊं शकले नाहींत, कारण याच वेळीं खंडाळयाच्या घाटांतील रस्ता खराब झाला होता.

## मुंबई सोडली

बोटीनें भोंगा ( Siren ) वाजविला. माझ्या मनांत विचित्र कालवाकालव चालू होती. बोटीवर चढण्याची शिडी काढून घेण्यांत आली. मातृभूमीचा आणि माझा धागा तुटल्यासारखें वाटूं लागलें. अशा वेळीं अपोलो बंदरावर खालीं जमलेल्या मंडळींत मला माझे वडील दिसले. मी डेकवर उभा होतों. बोट हलूं लागली. चमत्कारिक विचारांनीं माझें मन इतकें भांबावून गेलें होतें कीं, त्यावेळची आठवणसुद्धां अजून नकोशी वाटते. बोटीवरून मीं वडिलांना नमस्कार केला थोड्याच वेळांत मुंबईच्या मोठमोठ्या इमारती देखील हळूं हळूं धुक्यांत विराम पावत असल्याप्रमाणें दिसूं लागल्या. माझ्या पोटांत अतिशय कालवाकालव सुरू झाली. मला बोट फार लागूं लागली. मी आपल्या केबिन-मध्यें जाऊन पडलों. दुसऱ्या दिवशीं दुपारीं थोडा आराम वाटूं लागला. मध्यंतरीं एकादें द्राक्ष खावें तर तें सुद्धां बोट लागल्यामुळें जसेंच्या तसें बाहेर येई ! मन घराकडे सारखें ओढ घेई.

S. S. Pilasna बोटीची व्यवस्था फारच सुंदर होती. माझें तिकीट दुसऱ्या वर्गाचें होतें तरी आम्हांला सगळीकडे हिंडण्याफिरण्याची परवानगी असे. बोटीस धोका झाल्यास Life-Belt बांधून आपला जीव कसा वांचवावा या संबंधीं बोटीवर कवाईत पहिल्या एकदोन दिवसांत करून घेतात. यावेळीं बोटीवर एकच गोंधळ उडतो. खरोखरच बोट बुडते कीं काय असें वाटूं लागतें पण ही

भीति लौकरच मावळते. ही बोट म्हणजे एक राजवाडाच होता! प्रत्येक वर्गाला एक भोजनगृह, एक विश्रांतिगृह व एक धूम्रपानगृह असतें. या शिवाय डेकवर जिकडे तिकडे सुंदर गालिचे पसरलेले असतात. प्रत्येक वस्तु अतिशय स्वच्छ आणि लकलकीत ठेवलेली असते. बसावयाच्या हॉलमध्यें एकएक टेबलाभोंवतीं सुंदर स्प्रिंगच्या खुर्च्या ठेविलेल्या असून पामचीं आणि फर्नचीं झाडें कौशल्यानें ठेवलेलीं असतात. येथें पियानोही ठेवलेला असतो. वेळ फावेल तेव्हां तेथें मंडळी पत्ते खेळत बसतात आणि ज्यास गाण्याची चटक असेल तो पियानोवर बसून गुणगुणूं लागतो. बोटीवर सर्व सुखसोयींची तरतूद केलेली असते. दररोज कांहीं तरी नवा प्रोग्राम ठेवलेला असतो. एके दिवशीं पाहतां पाहतां पांच मिनिटांत कॅनव्हसचा हौद डेकवर उभा करण्यांत आला! आम्हीं पांच पंचवीस लोकांनीं त्यांत उड्या घेतल्या. कधीं कधीं डेकवर सिनेमा दाखवीत असत तर कधीं कधीं बँड चालत असे आणि त्या सुरावर लोक नाचूं लागत! या बोटीवर एक लहानशी व्यायाम-शाळाही होती. तेथें विजेचा घोडा, विजेची सायकल आणि विजेची वल्हवावयाची छोटी होडी होती. घोड्यावर बसून बटन दाबलें कीं, जोरांत घोडदौड सुरू होऊन चांगलींच हाडें नरम होत असत. तसेंच होडींत बसून होडी वल्हवतांना हातास रग लागे. सायकलवर बसून सायकल चालू केली म्हणजे समोर ठेविलेल्या घड्याळावर किती वेळांत किती मैल सायकल चालली हें समजत असे. बोटीवरील प्रत्येक प्रवाश्यास सर्व प्रवाश्यांची यादी देण्यांत येते. कोण कोठल्या देशाचे आहेत वगैरे यांत नोंद केली असल्यामुळें इतर लोकांची ओळख करून घ्यावयास या यादीचा चांगला उपयोग होतो. बोटीवरील वेळ इतका आनंदांत जातो कीं, शेवटीं बोट सोडूं नये असें वाटूं लागतें.

दोन तीन दिवसानंतर माझे बूट खराब झाले होते. गोऱ्या लोकांना बूट साफ करावयास कसें सांगावे म्हणून एके दिवशीं केबिनमध्यें दुसरें कोणी नाहीं असें पाहून मीं आपल्या बुटास स्वतःच लाली चढविली! गुलामगिरींत आम्हीं किती बुजरट झालों आहोंत याचें मला नंतर हंसूं येत असे. पुढें मीं दररोज रात्रीं बूट केबिन बाहेर ठेवूं लागलों व दररोज बूट साफ होऊं लागला!

बोटीवर वर्तमानपत्र मिळत नाहीं म्हणून रोजचें रोज Bulletin बातमी-पत्रक टाइप करून वांटण्यांत येत असे. बायरलेसनीं ज्या बातम्या येत त्यांचा

सारांश सर्वांना समजावा म्हणून ही सोय केलेली असते. पुढें एके दिवशीं आमच्या बोटीवर एक प्रकार घडला. एक खलाशी ( Mast ) मास्टवरून पडून मेला. याला एका लाकडी कॉफिनमध्यें घालून जलसमाधि देण्यांत आली.

बोटीवर एक छोटेखानी दुकान होतें. तसेंच डॉक्टर, धोबी, न्हावी वगैरेंचीही व्यवस्था होती. एक पाद्रीही होता. खलाशी मेल्यावर त्याच्या आत्म्याला शांति मिळावी म्हणून याच पाद्र्यानें प्रार्थना केली. प्रेतास जलसमाधि दिल्यावर बोटीनें त्या जागेस एकवेळ वळसा दिला व बोट पूर्ववत् चालू झाली. आम्हीं सर्वांनीं वर्गणी जमा करून त्या खलाश्याच्या मुलांबाळांकरितां कांहीं रक्कम पाठवून दिली. बोटीवर बहुतेक आमचा वेळ डेकवर जात असे. डेकवर बसावयाची आरामखुर्ची आपली आपण घ्यावी लागते, ती मीं मुंबईस विकत घेतली होती. डेकवर बहुतेक लोक कादंबऱ्या वाचीत पडलेले दिसतात. हीं पुस्तकें बोटीच्या लायब्ररींतून मिळतात. कांहीं लोक धूम्रपान करीत आपापल्या देशाच्या गप्पा मारीत बसतात. हिंदुस्तानी विद्यार्थ्यानें जरूर इतर लोकांशीं मिसळावें. अशानें विचार विनिमय होऊन आपलें मन प्रगल्भ होतें.

बोटीवर समुद्रच आपला आवडता सोबती वाटूं लागतो. अथांग समुद्राच्या निरनिराळ्या स्थित्यंतराबरोबर आपल्या मनांतही निरनिराळया भावना उचंबळूं लागतात. समुद्र खवळला कीं भीति वाटूं लागते तर कधीं शांत समुद्राच्या शीतल वाऱ्यानें मन प्रसन्न होतें. डेकवरून क्षितिजाकडे शून्य मनानें पहात बसावेंसें वाटतें. समुद्रावर सूर्योदयाची व सूर्यास्ताची शोभा फारच सुंदर आणि खुलून दिसते. कोठें कोठें सील माश्यांचे कळप सकाळचें कोवळें ऊन खात समुद्रसपाटीवर इतस्ततः उलट्या सुलट्या उड्या घेत असलेले दिसतात ? लाटा बोटीवर आदळून फुटूं लागल्या म्हणजे तुषार उंच उडून सुंदर मोत्यांचे ढीग उंच फेंकले जात आहेत कीं काय असा क्षणभर भास होतो ! बोटीच्या मागच्या भागास एका दोरखंडास एक चक्र बांधलेलें असतें ! असें सांगत कीं या चक्राच्या फिरण्याच्या वेगावरून बोटीचा वेग ठरविण्यांत येतो. बोट कोणत्या वेगानें चालली आहे वगैरे बातमी नोटीस बोर्डावर लिहिलेली असते. तसेंच पश्चिमेकडे जात असतां घड्याळांत सारखा फरक पडतो. आम्हांला आपलीं घड्याळें दररोज बोटीच्या घड्याळावरून लावून घ्यावीं लागत. आमची बोट साधारण ७५ मैलांच्या वेगानें अरबी समुद्रांतून वाट काढीत होती. दिवसां व

रात्रीं डेकच्या कठड्याला टेकून आम्हीं किती तरी तासचे तास घालविले असतील! रात्रीं बोट वेगानें चालू लागली म्हणजे पाण्याला इतक्या जोरानें कापून जाई कीं, या पाण्यांतूनसुद्धां घर्षणामुळें ठिणग्या उडत! रात्रींचा सौम्य आणि शीतल समुद्रावरचा वारा, डोक्यावर चंद्राची चमकणारी कोर आणि त्या भोंवती अनंत ताऱ्यांचा लुकलुकाट अशावेळीं आपल्या बोटीपासून कांहीं अंतरावर दुरून दुसरी बोट जाऊं लागली म्हणजे त्या दुसऱ्या बोटीची शोभा तर अवर्णनीयच; हजारों दिवे पाण्यावर तरंगत असल्याचा भास होतो. समुद्रावरची दिवाळीच ही! ही शोभा दुर्बिणींतून पहावयास फारच मौज वाटते. अशा वेळीं दुसऱ्या बोटींतील अनोळखी लोकही आपापले हातरुमाल फडकवून आनंद व्यक्त करतात.

## एडन

मुंबई सोडल्यापासून पांचव्या दिवशीं आम्हाला एडनचे खडकाळ डोंगर दिसूं लागले. बोटीवरून जमीन दिसूं लागली म्हणजे सर्वांनाच आनंदी आनंद वाटूं लागतो. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर आनंदाची छटा दिसूं लागते आणि प्रत्येक जण जमीनीवर पाय ठेवण्यास उत्सुक झालेला दिसून येतो. आमची बोट समुद्रांत बऱ्याच दूर अंतरावर थांबली. आम्ही लहान लहान होड्यांतून बंदरावर गेलों. इष्टमित्रांना लिहिलेलीं पत्रें पोष्टांत टाकून थोडासा फेरफटका केला. एडनला हिंदुस्थानी लोक पुष्कळ दिसून येतात. एडनला कांहीं लोक मोटारींतून पाण्याचा तलाव पहावयास गेले. एडन हें अरबस्तानचें बंदर आहे. येथें अरबी व हबशी लोकांचा मोठा भरणा आहे. पूर्वीपासून हिंदुस्थानशीं व्यापाराबद्दल या ठिकाणची प्रसिद्धि आहे. ईस्ट इंडिया कंपनीनें हें बंदर १८३९ मध्यें आपल्या ताब्यांत घेतलें. येथील लोकसंख्या सुमारें ४५००० च्या वर आहे. बोटीवर लागणाऱ्या खाद्य सामानाचा सांठा एडनवर करून घेण्यांत येतो. उंच, सडपातळ आणि गोरे अरब मण्याचें सामान, काठ्या, गालिचे, सिगारेटस् वगैरे विकावयास बोटीवर येतात. यांचे भोंवतीं एकच गर्दी होते. आमच्या बरोबर असलेल्या एका गृहस्थानें चाळीस पन्नास रुपयास सर्व अरबी पोषाकच विकत घेतला. एडनला आपलें नाणें चालतें. या पुढें मात्र रुपये कोणत्याही देशांत चालत नाहींत म्हणून मीं माझ्या जवळचे उरलेले

रुपये बदलून त्यांचे पौंड करून घेतले. बोटीवर जे दलाल येतात ते एकादें काळें सावज मिळालें तर त्यास चांगलाच धोका देतात. गडबडींत कमी पौंड्स हातीं देऊन चालते होतात. म्हणून बोटीवर प्रथम Inquiry Bureau मध्यें भाव विचारणें बरें. संध्याकाळीं चार पांचाचे सुमारास आमची बोट एडन वरून हलली व आम्हीं तांबड्या समुद्रांतून प्रवास करूं लागलों. याला तांबडा समुद्र असें नांव कां पडलें याचा आम्हाला अखेरपर्यंत पत्ता लागला नाहीं. अरबी समुद्रांतून आमची बोट हेलकावे खात खात आली ती आतां तांबड्या समुद्रांत शांतपणें चालू लागली होती.

## सुवेझ कॅनॉल व बंदर

सुवेझच्या आखाताच्या एका कोपऱ्यावर सुवेझ बंदर वसलेलें आहे. इजिप्तच्या ताब्यांत हें बंदर आहे. हिंदुस्तान आणि इजिप्तमध्यें दळणवळणाचा जमिनीवरचा मार्ग होता तेव्हांपासून हें ठिकाण व्यापाराच्या दृष्टीनें महत्त्वाचें गणलें जात आहे. इ. स. १८६९ सालीं जेव्हां सुवेझ कॅनॉलचें काम पूर्ण झालें तेव्हांपासून तर या बंदरास फारच महत्त्व प्राप्त झालें आहे. सुवेझ कॅनॉलच्या योगानें तांबडा समुद्र आणि भूमध्यसमुद्र जोडला गेला आहे. द. लेसेप्स नांवाच्या एका फ्रेंच इंजिनियरनें हा कालवा तयार केला. यापूर्वी हिंदुस्तानांत युरोपांतून बोटी आफ्रिकेस वळसा घालून येत होत्या. सुवेझ कॅनॉल झाल्यापासून दळणवळणाचा मार्ग फारच सुलभ झाला आहे. सुमारें सहा हजार मैलांचें अंतर कमी झालें. या कालव्याची लांबी सुमारें ८६ मैल आहे. पण कालव्यांतून एक मोठी बोट जाईल एवढाच मार्ग आहे. कॅनॉलच्या दुतर्फा वालुकामय प्रदेश दिसूं लागतो. कोठें कोठें कांटेरी झुडपें नजरेस पडतात. कालव्याची रुंदी २०० ते ३०० फूटच आहे. दोन्हीं बाजूची वाळू कालव्यांत घसरून पडत असते म्हणून वाळू काढून एका अंगावर टाकण्याचें काम सारखें चालू असतें. सुवेझ कॅनॉलचा पहिला भाग, आम्ही झोंपेंत असल्यावेळींच आमच्या बोटीनें आक्रमून टाकला होता. कालव्यांतून पसार व्हावयास आम्हाला दहा अकरा तास लागले.

## पोर्ट सय्यद

सकाळीं ९ च्या सुमारास आमची बोट पोर्ट सय्यद बंदरास लागली. तेथें

चार तास बोट थांबणार होती. एडन प्रमाणेंच अनेक व्यापाऱ्यांनीं बोटीवर गराडा घातला, तर कांहीं वाटाडे खालीं गांव पाहण्यास या अस इषारे करूं लागले. गांव पहावयाचें असेल तर चार सहा मंडळींनीं ग्रुप करून जावें असें आम्हीं ठरविलें. पण गर्दींत हैदराबादचे एक गृहस्थ एकटेच पुढें निघून गेले. बोटीवरून उतरल्याबरोबर येथें भामट्यांचा फार सुळसुळाट आहे असें दिसून आलें. जो तो, इकडे चला तिकडे चला म्हणून आमच्याशीं जवळजवळ हिसकाहिसकी करूं लागला. येथील वाटाडे अतिशय लोचट तरी पण सावज पाहून पकडतात. हौशी आणि रंगेल प्रवासी भेटला तर त्याला अगदीं नंगानाच सुद्धां दाखवितात. अर्थात पैसे उकळणें हा त्यांचा मुख्य उद्देश असतो. येथें शिलिंग पेन्स वगैरे चालत नसल्यामुळें थोड्या रकमेचें फ्रँक्समध्यें रूपांतर करून घेतलें व चहा कॉफी घेऊन व थोडा फराळ करून परत आम्ही बोटीवर फिरलों. कॉफींत चांगलेंच बुडालों ! कारण कांहींच्या जवळून तर एक एक कप गचाळ कॉफीस 'हॉटेलवाल्यांनीं एक शिलिंग लाटला ! परत येऊन पाहतों तर हैद्राबादचे गृहस्थ आपला अनुभव सांगूं लागले आणि त्यांनीं नग्न चित्रांचें एक पाकीट विकत घेतलें होतें तें दाखविण्याच्या उद्देशांनीं त्यांनीं काढलें. आम्ही सर्व कुतूहलानें पाहूं लागलों तों त्यांत दोन आण्याचे खेळावयाचे पत्ते निघाले ! सर्वच हंशा पिकला. या चित्रांकरितां त्या गृहस्थानें कमींत कमी पांच सात रुपये दिले होते ! माझ्याबरोबर पोर्ट सय्यदच्या रस्त्यावर एक गृहस्थ टर्किश स्त्रीटस् घ्या म्हणून फारच लगट करूं लागला. मीं तेथील पोलिसला हा प्रकार सांगितला पण तोहि नुसतां हंसतच उभा राहिला. मीं मनांत ठरविलें कीं हा भामट्यांचा देश असावा आणि पोलिस शिपाई पण त्यांच्यापैकींच दिसतो.

पोर्ट सय्यद बंदरांत द लेसेप्सचा एक भव्य पुतळा आहे. साधारण ३० ते ४० फू. उंच चौथऱ्यावर २२ फू. उंचीचा हा पुतळा आहे. पोर्ट सय्यद सोडल्याबरोबर आमच्या बोटीनें युरोपांत प्रवेश केला. येथून निघाल्यावर दि. १४ सप्टेंबरला आमची बोट व्हेनिस येथें पोंचली. आम्हीं येथें उतरून पुढचा प्रवास रेल्वेनीं करावयाचें ठरविलें होतें. बोटीवरून उतरावयाचे वेळीं केबिन् बॉयला मीं चार पांच शिलिंग त्याच्या हातावर ठेवून माझीं डेक चेअरही त्याला देऊन टाकली. कमी बक्षीस दिलें तरी हे लोक कधींच नाखूष होत नाहींत.

## व्हेनिस

व्हेनिस शहर फारच मनोहर आहे. प्रथम बंदरावर आमच्या सामानाची तपासणी झाली. तेथून आम्ही निघालों तों सरळ एका होडग्यांत Gondola मध्यें बसलों. इटलींत बंदराचे फोटो घेण्याची सक्त मनाई होती. या शहरांत रस्ते फारच क्वचित् दिसतात. समुद्राच्या पाण्याचे कालवे सर्व व्हेनिसमधून खेळविले आहेत. गॉंडोला मधून जातांना फारच मौज वाटते. आम्ही बसलेली होडी एका हॉटेलच्या पायऱ्याशीं थांबली.

आमच्यांपैकीं कोणासच इटालियन भाषा येत नव्हती म्हणून प्रत्येक ठिकाणीं आम्हांस भाषेची अडचण पडूं लागली. आम्ही शाकाहारी आहोंत असें खाणाखुणांनीं हॉटेलवाल्यास कळविलें. आमच्यापुढें कसलेंतरी शेवाळें त्यानें शिजवून आणून ठेविलें. ब्रेड बटर व फळें खाऊन आम्हीं तो दिवस काढला. आमच्या बरोबरच्या एका स्नेह्यानें एका विश्रांति-गृहांत 'लेमन' पाहिजे म्हटल्याबरोबर हॉटेलवाल्यानें बाजूच्या भाजी मार्केटकडे बोट दाखविलें! 'लिमू नोह' असें विश्रांति-गृहांतील पोऱ्यानें विचारल्यावर आम्हीं 'होय' म्हटलें व आमची साधी चूक आमच्या लक्षांत आली.

व्हेनिस शहर पो नदीच्या मुखाजवळ असलेल्या शंभर लहान लहान बेटांवर वसलेलें असून एक चांगलें बंदर आहे. पुरातन कालांपासून हें शहर खलाश्यांकरितां प्रसिद्ध आहे. पूर्वीं येथील व्यापारी हिंदुस्तानचा माल मध्य युरोपांत खपवीत. येथें कालव्याच्या दोन्ही बाजूस सुंदर उंच उंच इमारती आहेत. मधून मधून इमारतींच्या भिंतीवरून सिनॉर मुसोलिनीची मूठ वळून तोंड वासलेली चित्रें दिसत. यावरून आम्ही कल्पना केली कीं, फॅसिझमच्या चळवळीसंबंधींच्या या जाहिराती असाव्यात. शहरांत मोठे रस्ते नाहींत व म्हणून मोटारींची गडबड नसल्यामुळें हें शहर तितकें गजबजलेलें दिसत नाहीं, धुळीचें तर नांवच नाहीं. असें म्हणतात कीं, व्हेनिस श्रीनगरप्रमाणें सुंदर आहे. व्हेनिसमध्यें कालव्यावरून बांधलले पूलही सुंदर दिसतात. ठिकठिकाणीं पुतळे दिसतात. इटली कलेकरितां पुरातन काळापासून प्रसिद्ध आहे. आम्ही ड्यू कॉले पॅलेस नांवाची एक इमारत पाहिली. पहिल्या व दुसऱ्या मजल्यावर कमानींच्या मोठमोठ्या रांगा असल्यानें ही इमारत फारच उठावदार दिसते. एकच दिवस

व्हेनिस येथें राहून आम्ही पुढच्या प्रवासास लागलों. व्हेनिस स्टेशनसुद्धां एका कालव्यावरच आहे. गॅांडोलामधून आम्ही उतरलों तों स्टेशनच्या पायऱ्यावरच. येथून आम्ही Continental Express Train नें प्रवास केला. ही गाडी पॅडूआ-व्हिरोना, मिलान, टयूरिन वरून स्वित्झरलंड मधून उत्तर फ्रान्सच्या भागांतून कॅले बंदरावर जाते. इटली स्वित्झरलंड व फ्रान्सच्या सरहद्दीवर आमचीं तिकिटें व पासपोर्ट्स तपासण्यांत आले.

मध्य युरोपांतून जातांना दिसणारें सृष्टिसौंदर्य फारच मनोवेधक आहे. आल्पस् पर्वताचे उंच उंच कडे, त्यावर सकाळच्या किरणांत चमकणारे बर्फाचे ढीग, खालच्या सपाटीवरची हिरवीगार झाडी, यांत वसलेलीं छोटीं छोटीं शहरें फारच मनोरम दिसतात. उंचावरून कांहीं ठिकाणांवरून वाहात असलेले पांढरे स्वच्छ धबधबे व बाजूस अर्धवट गोठलेलें पाणी मीं पूर्वी कधींच पाहिलें नव्हतें. कोठें कोठें मधून मधून सुंदर तलावही दृष्टीस पडतात. आणि भोंवतालच्या हिरवळी-वर चरणारे मेंढरांचे मोठे कळप दिसतात. या भागांत शेती कमी दिसून येते. द्राक्षांचे मळे मात्र विपुल दिसून येतात. काळया द्राक्षांचे घोंसचेघोंस लागलेले आम्हीं पळत्या गाडींतून पाहिले आणि मनांत म्हटलें द्राक्षें आंबट असावींत!

## कॅले बंदर

सरासरी अठ्ठावीस तासांत आम्ही व्हेनिसहून फ्रान्सच्या कॅले बंदरावर येऊन पोंचलों. पुन्हां पहिल्याप्रमाणेंच सामानाची तपासणी झाली. दुपारीं एक दीडच्या सुमारास आम्ही इंग्लिश चॅनलच्या प्रवासास सज्ज झालों. एक लहानशी बोट तयारच होती. जंगी जहाजांतून प्रवास केल्यावर या छोट्या बोटीवरच प्रवास सुरू झाला. राजवाड्यांत राहिलेल्या माणसास खेड्यांतील झोंपडींत रहावयास गेल्यावर जसें वाटूं लागतें तसें आम्हांस झालें. आम्ही या छोट्या बोटीच्या डेकवरच वेळ काढला. सरासरी दोन तासांत Folkston फोक्स्टन बंदराचे खडूचे डोंगर आम्हांस दिसूं लागले. फोक्स्टन बंदरावर पुन्हां सामानाची तपासणी झाली. एका सिगरेट टिनपेक्षां जास्त सिगरेटस् जवळ असल्यास त्यावरही येथें ठराविक कर आकारला जातो. फोक्स्टन बंदरावर आगगाडी तयारच होती. तेथून तीनचार तासांत सायंकाळीं आम्ही लंडनच्या व्हिक्टोरिया

स्टेशनवर आलों. १६ सप्टेंबरला इंग्लंडच्या भूमीवर जेव्हां आम्ही पाय ठेवले तेव्हां आम्हांला आपल्या घरीं आल्यासारखें वाटलें.

## लंडन

व्हिक्टोरिया स्टेशनवर माझे धाकटे बंधू रामराव मला घ्यावयास येणार होते. परंतु ऐन वेळीं ते न येऊं शकल्यामुळें मी थोडा गोंधळल्यासारखा झालों. गाडींतून सर्व लोक आपापलें सामान घेऊन चालूं लागले. आपलें सामान वाहून नेण्यास यांना कमीपणा वाटत नाहीं. अर्थात एका माणसास न झेपण्यासारखें सामान असल्यास पोर्टर मदत करतात. यात्रेस निघाले म्हणजे इतर यात्रेकरू जिकडे जातात तिकडेच नवखेही वळतात, त्याप्रमाणें आम्ही दुसऱ्या हिंदुस्थानी मंडळी-बरोबर 'गॉवर स्ट्रीट' वरील Y. M. C. A. त पथारी ठोकली. दुसरे दिवशीं सकाळीं माझ्या धाकटया बंधूंनीं माझी दुसरीकडे राहण्याची व्यवस्था केली. Y. M. C. A. त हिंदुस्थानी तरुण मंडळींचा घोळका दिसूं लागला होता. मला सर्व मंडळींत एकदम मिसळावें असें वाटलें. पण कोणीच कांहीं बोलेना ! नंतर असें कळलें कीं ओळख करून दिल्याशिवाय इकडे कोणी कोणाशीं बोलत नाहींत ! असा येथील शिष्ट-संप्रदाय आहे.

लंडनमध्यें मीं तीन आठवडे काढले. पुढें काय करावें हें कांहीं सुचेना. खूपसें शिकावयाचें या कल्पनेच्या जोरावर येथवर मजल मारली. युनिव्हर्सिटींत प्रवेश मिळविण्याकरतां मी अर्ज टाकले होते. पण मला नकारार्थी उत्तरें येऊं लागलीं. लंडन, ऑक्सफर्ड, कॅंब्रिज येथील विश्वविद्यालयांत तर शिरकाव होणें मला दुरापास्त दिसूं लागलें. लंडनमधील हे दिवस फारच चिंतेंत गेले. मन-स्वास्थ्य नाहींसें झालें. परदेशांत येण्यापूर्वीं इकडील विश्वविद्यालयांत प्रवेश मिळविणें सोईचें होतें. मला ही चूक रात्रंदिवस डोळयापुढें दिसूं लागली. माझे धाकटे बंधु मला 'वैमानिक विद्या शिकण्याकरितां 'क्रॉयडन' येथें रहा' असा आग्रह करूं लागले. पण कर्मधर्मसंयोगानें वेल्स युनिव्हर्सिटीकडून थोडेसें आशादायक उत्तर आलें. तें असें कीं, 'मला इंग्रजींतून कोणत्याही विषयावर एक निबंध लिहावा लागेल. तो जर पसंत पडला तर कॉलेजमध्यें घेतलें जाईल. आणि कॉलेजच्या पहिल्या तिमाहींत पास न झाल्यास मॅट्रिकच्या

परीक्षेस बसावें लागेल." या सर्व अटी कबूल करून मी वेल्स युनिव्हर्सिटीच्या ॲबरिस्टविथ येथील कॉलेजांत पदार्पण केलें.

## डॉ. परांजपे यांची भेट

लंडनहून निघण्यापूर्वी २९ सप्टेंबरला मी रँग्लर परांजपे यांना भेटावयास गेलों. ते यावेळीं इंडिया कौन्सिलचे मेंबर होते. वडिलांची सक्त ताकीद होती कीं, मी त्यांच्या सल्ल्याप्रमाणें वागावें. परांजपे तेथें सहकुटुंब राहात होते. त्यांची तेथील साधी राहणी पाहून मला फारच आश्चर्य वाटलें. एका साध्या इमारतीच्या वरच्या मजल्यावर ते रहात असत. घरच्या गोष्टींसंबंधीं त्यांनीं विचारपूस केली. आणि विलायतेंत पैशाचा अपव्यय करूं नये असा उपदेश केला. अजून मी पक्का शाकाहारी होतों. परांजपे यांनीं आपल्या घरीं मला मांसाहाराची दीक्षा दिली. मी म्हटलें कीं, 'मला या पदार्थांचा वाससुद्धां खपत नाहीं.'' यावर ते जरा रागांतच म्हणाले कीं, 'तूं कांहीं महात्मा गांधींच्या सारखा येथें Experiment ( प्रयोग ) करावयास आला नाहींस. आणि असाच हट्ट धरशील तर प्रकृति खराब करून घेशील.' यापुढें ३–४ महिन्यानंतर समोर येतील ते पदार्थ खावयाचा मी प्रयत्न करूं लागलों. इंग्रजी जेवण-खरें म्हटलें तर मनापासून मला कधींच आवडलें नाहीं. परांजप्यांकडे चहा-फराळ झाल्यावर मी त्यांचा निरोप घेऊन निघालों. घटकाभर पुण्यासच त्यांच्या घरीं असल्याचा भास झाला.

## ॲबरिस्टविथ

### ( विश्वविद्यालयीन शहर )

ॲबरिस्टविथ एक विश्वविद्यालयीन शहर वेल्सच्या पश्चिम किनाऱ्यावर वसलेलें आहे. वेल्श भाषेंत ॲबर म्हणजे गांव आणि एस्टविथ एका नदीचें नांव आहे. एस्टविथ नदीवर वसलेला गांव असा या शब्दाचा अर्थ आहे. हें सुंदर शहर आहे. चार पांच मैलपर्यंत समुद्रकांठ ( Promenade ) बांधून काढला आहे. समुद्राच्या आंत बऱ्याच अंतरावर पुलासारखा रस्ता ( pier ) काढून त्यावर एक विश्रांतिगृह आहे. याला 'पिअर कॅफे' असें म्हणतात. यांत एक लहानसें नृत्यालयही आहे. समुद्राच्या बाजूस एक टेकडी आहे. हिचें नांव Constitution

Hill आहे. या टेकडीवरून पाहिलें असतां सर्व शहर चित्राप्रमाणें सुंदर दिसतें. आमचें कॉलेजही समुद्रकांठांवर वसलेलें आहे, इतकें कीं, कधीं कधीं समुद्र खवळला म्हणजे वर्गाच्या भिंतीवर व तावदानांवर समुद्राच्या लाटांचे तुषार उडत असत! सर्व शहरांत जिकडे तिकडे विद्यार्थ्यांचे थवेच्या थवे फिरतांना दिसूं लागतात. वसंतऋतूंत येथील हवा फारच चांगली असते म्हणून इंग्लंडां-तील गजबजलेल्या वस्तींतील राहणारे लोक या दिवसांत येथें येऊन राहतात. मध्यम स्थितींतील लोकांचा हा एक परिपाठच आहे कीं, वर्षांतून एक महिना तरी अशा प्रकारच्या समुद्रकांठांवरच्या शहरीं जाऊन राहावयाचें आणि हंसण्याखेळण्यांत दिवस घालवावयाचे. उन्हाळयाच्या दिवसांत तर ॲबरला एकाद्या यात्रेच्या ठिकाणचें स्वरूप येई. आक्टोबरच्या पहिल्या तारखेस मी ॲबरला पोंचलों. पहिल्या दिवशीं मी ॲबच्या लायन्स हॉटेलमध्यें राहिलों होतों. रात्रीचें जेवण आटोपून मी झोपावयास गेलों. एका मेड सर्व्हंटनें गरम पाण्यानें भरलेल्या दोन चिनी मातीच्या बरण्या खोलींत आणून ठेविल्या होत्या. मला वाटलें रात्रीं प्यावयास पाणी ठेविलें असेल. सकाळीं त्या बाईनें त्या बरण्या जेथल्या तेथें पाहून तोंडांत बोट घातलें! ‘ बिछाना गरम रहावा म्हणून या बाटल्या बिछान्यांत ठेवायच्या असतात.’ असें ती म्हणाली. न्याहारीच्या वेळीं सर्व लोकांत या मेडनें ‘ we have a baby ’ असें म्हणून खूपच थट्टा केली.

विद्यार्थ्यांकरितां येथें वसतिगृह नव्हतें. पण ठराविक Registered Houses मधूनच विद्यार्थ्यांना राहावें लागत असे. अशा घरच्या मालकिणीस विद्यार्थ्यांच्या गैरवागणुकीसंबंधीं रिपोर्ट करावयाचा अधिकार दिलेला असतो. आपलें घर कॉलेजकरितां रजिस्टर्ड करावयास कॉलेजमध्यें हिला थोडी रक्कम फी म्हणून दाखल करावी लागते. मी अशाच एका घरांतील कुटुंबांत रहावयास गेलों.

## शिक्षण–पद्धति

टर्म ऑक्टोबरच्या पहिल्या तारखेस सुरू झाली. आणि कॉलेजांतील शिक्षण घड्याळांतील यंत्राप्रमाणें सुरू झालें. इकडे एकदां टर्म सुरू झाली म्हणजे मध्यंतरीं सुटया वगैरे नसतात. हिंदुस्थानांतील कॉलेजांत हिंदु, मुसलमान, पार्शी, जैन आणि ख्रिस्ती लोकांच्या सणांच्या सुट्टयामुळें माझ्या मतें अभ्यासांत फारच

व्यत्यय येतो. येथील शिक्षण–पद्धतींत ही एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं, विद्यार्थ्यांवर अभ्यासक्रमाचा फार ताण पडत नाहीं. वर्गांत ३०–३५ विद्यार्थी असल्याकारणानें अध्यापकाचें लक्ष हरेक विद्यार्थ्यावर असतें. हिंदुस्थानांतील कॉलेजसंबंधीं माझा अनुभव याच्या उलट आहे. शंभर शंभर विद्यार्थी वर्गांत भरलेले असतात. प्रोफेसर ठराविक वेळीं वर्गांत येऊन तासभर अस्खलित लेक्चर देऊन मोकळे होतात, आणि विद्यार्थी अंधारांत चांचपडत कांहीं समजलें, कांहीं समजलें नाहीं असें म्हणत घरीं पसार होतात ! पुढें एकवेळेस फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपाल श्री. के. रा. कानिटकर यांची भेट लंडन येथें झाली होती. इकडील शिक्षणासंबंधींची ही गोष्ट मी त्यांच्या निदर्शनास आणली होती. आमच्या लॉ कॉलेजचे डीन बॅरिस्टर सिलव्हिअन लेव्ही M. A. LL. D. यांचें लक्ष प्रत्येक विद्यार्थ्यावर असे. त्यांची, पाऊण तास विषयनिरूपण करून शेवटीं पंधरा मिनिटांत त्या विषयावर थोडक्यांत टिपण करून देण्याची पद्धति मला फारच आवडली. येवढ्यावरही न समजलें तर शिक्षकांस केव्हांही विचारून विद्यार्थी शंकासमाधान करून घेत. विद्यार्थी प्रोफेसराची खूप थट्टा करीत पण वर्ग चालू असतांना मात्र वर्गांत गंभीर वातावरण राही. स्टँपिंग सारखा प्रकार चार वर्षांत एकदांही अनुभवास आला नाहीं. हिंदुस्थानच्या विद्यार्थीवर्गाचीं मनें आपल्या भावी आयुष्यावर खिळली असल्याकारणानें कीं काय, त्यांचीं मनें मोठीं चिंताग्रस्त झालेलीं मला दिसून येत असत. इकडील विद्यार्थी आपल्या पुढच्या आयुष्याची भलतीच चिंता करीत बसत नाहीं. भावी संकटांची तो फिकीर बाळगीत नाहीं त्याचें मन वर्तमानकालांत जास्त वावरतें. आपला अभ्यास आणि हंसणें खेळणें हेंच त्याला माहीत. या कारणानें सर्व कॉलेजांत एकप्रकारचें उत्साही वातावरण निर्माण होतें.

कॉलेजची वार्षिक फी २४ पौंड असते. यांत एक पौंड मेडिकल फी म्हणून घेण्यांत येते. कॉलेजची एकंदर मेडिकल फी गांवांतील तीन चार प्रख्यात डॉक्टरांना वांटून टाकण्यांत येते व करार त्यांच्याशीं असा केला जातो कीं, त्यांनीं कॉलेजच्या विद्यार्थ्याला फुकट औषध व सल्ला द्यावा.

कॉलेजला जोडूनच एक इमारत होती जिला Refectory म्हणत. विद्यार्थी मधल्या वेळीं येथें बसत. या ठिकाणीं वर्तमानपत्रें, मासिकें, पत्ते, पियानो वगैरे वरच्या मजल्यावर आणि खालच्या मजल्यांत एक विश्रांतिगृह होतें, ज्यांत

चहा, कॉफी, बिस्किटें वगैरे पदार्थ ठेविलेले असत. Refectory ची व्यवस्था विद्यार्थ्यांकडेच असे. विद्यार्थ्यांनें स्वतःच कॉफी वगैरे ओतून घ्यावी, दोन चार जशीं लागतील तशीं बिस्किटें घ्यावीं, एका पेटींत त्याची किंमत टाकून द्यावी. कॉलेजांतील जीवन कंटाळवाणें कधींच होत नाहीं. अभ्यास, खेळ आणि इतर करमणूक यांत प्रमाणशीरपणा असतो. अध्ययन आणि करमणूक यांची सांगड घातल्यानें दिवस फारच आनंदांत जातात आणि अभ्यासाचा कधीं ताण पडत नाहीं. आठवड्यांतून रविवारीं पूर्ण आणि बुधवारीं अर्धा दिवस सुटी असते. बुधवारीं दुपारीं टेनिस, हॉकी, रग्बी वगैरेंच्या मॅचेस ठेवण्यांत येतात. बुधवारीं सर्व मुलें कॉलेजच्या क्रीडांगणावर जमलेलीं दिसतात.

ॲबर येथें एक भली मोठी तीन मजली नॅशनल लायब्ररी आहे. ही इमारत एका टेकडीवर वसलेली आहे. कॉलेजच्या विद्यार्थ्यांस येथें वाटेल तें पुस्तक वाचावयास मिळतें. या ग्रंथसंग्रहालयास जोडून जुने ग्रंथ (पोथ्या), चित्रें, पुतळे, नाणीं वगैरे पदार्थांचें एक वस्तुसंग्रहालयही आहे. आणि तळमजल्यावर एक छापखानाही आहे. अभ्यासी विद्यार्थी बुधवारीं येथें आपल्या आवडीचीं पुस्तकें वाचीत बसलेला दिसेल तर कांहीं विद्यार्थी आपल्या मैत्रिणींसह जवळ पासच्या डोंगरावर किंवा लांब समुद्रकांठावर सहल करावयास जातील.

ऑक्टोबरच्या दुसऱ्या आठवड्यापासून कडाक्याची थंडी सुरू होते. झाडांवर, रस्त्यांतून, घरांवर बर्फच बर्फ दिसूं लागतें. झाडांचीं पानें थंडीनें झडून जाऊन डहाळीवर बर्फाचे पांढरे थर बसतात. डोंगरांतील झऱ्याचें पाणी वगैरे पार गोठून जातें. अशा वेळीं ओव्हरकोट चढवून खूप लांब सहल करून येण्यांत मला फारच मौज वाटे. पुष्कळ ठिकाणीं मुलें व मुली पिठूळ बर्फाचे चेंडू करून एकमेकांच्या अंगावर फेकत असलेलीं दिसून येतात. अशावेळीं मला पूर्वीं मींच लिहिलेल्या दोन ओळी आठवत असत.—

हिम अंथरलें जिकडे तिकडे हिम अंथरलें सारें
कसि पसरला चांदीचा हा लुकलुकती वर तारे !

थंडीच्या दिवसांत अंगावर कपडे फारच घालावे लागतात. अंगास चिकटून अंडरवेअर, त्यावर शर्ट, त्यावर पुल ओव्हर किंवा जाकीट, मग कोट आणि वर ओव्हर कोट. सकाळीं एकदां कपडे चढविले म्हणजे झोपण्याचे वेळींच ते बदलावयाचे. मला इतकें कपडे चढविणें जिवावर येई पण करतां काय !

बसावयाच्या खोलींत ( Sitting room ) सकाळपासून रात्रीं अकरापर्यंत शेकोटी पेटलेली असावयाची, खोलींत गालिचे असावयाचे. येथें मऊ खुर्चीवर किंवा कोचावर शेकोटीजवळ बसून गप्पा मारणें हें थंडीच्या दिवसांतील मुख्य काम! अर्थात पुस्तकें व वृत्तपत्रें वाचीत बसावयाचें तर ह्या शेकोटी जवळच बसावें लागे. घरांच्या बाबतींत स्वच्छता, व्यवस्थितपणा आणि टापटीप फार ठेवली जाते. बसावयाचे खोलींत एल टेबल मधोमध ठेवून बहुतेक त्यावरील पुष्प-पात्रांत गुलाब, डॅफोडिल्स, टूलिप्स अशीं फुलें ठेवलेली असावयाची. हीं फुलें एकदां विकत घेतलीं म्हणजे कमींत कमी दहा बारा दिवस टिकतात. खोलींत सुंदर चित्रें फ्रेम करून टांगलेलीं असावयाचीं. हे लोक इकडे जमिनीवर कांहीं पदार्थ पडूं नयेत अशी फार दक्षता बाळगतात. आठवड्यांतून एक वेळेस सर्व पदार्थांची साफसफाई होते. कडी कोंडेसुद्धां पॉलिश लावून चकचकीत करण्यांत येतात. मोठ्या ताव-दानांना पडदे असावयाचेच. अशा प्रकारच्या राहणीनें जीवनास एक प्रकारचें सौंदर्य प्राप्त होतें आणि मन नेहमीं प्रसन्न राहतें. 'दो दिन की दुनिया, क्षणभंगुर जीवन, ही सर्व माया' अशा विचाराच्या आम्हां हिंदी लोकांना इंग्रजी जीवनां-तील हें सौंदर्यरहस्य कितपत पटेल कोणास ठाऊक! जगांत कसे तरी दिवस काढावयाचे हें जसें कांहीं आमचें वेदवाक्य ठरत आहे. संबळींतील पितळी मूर्तींना रोज आपण स्नान घालून झकझकीत ठेवतो तेवढ्याच तत्परतेनें इक-डील लोक घरांतील प्रत्येक वस्तु स्वच्छ ठेवतात! हिंदुस्थानांतील आणि युरोपांतील लोकांच्या आर्थिक पारमार्थिक कल्पनाच निराळ्या असल्यामुळें त्यांच्या आणि आपल्या जीवनांत तसेंच जमीन अस्मानाचें अंतर पडलें असावें. आमचीं मनें आध्यात्मिक विचारांनीं इतकीं भारून गेलीं आहेत कीं, जड वस्तूकडे आम्ही क्षुद्रतेनें पाहतों. जडांतील सौंदर्य आमच्या नजरेंत भरतच नाहीं. आर्थिक परि-स्थिति आमची निकृष्ट असल्यामुळें आम्ही सुखाचा संसार करूं शकत नाहीं ही गोष्ट थोड्या अंशीं खरी आहे. पण सुखानें राहूनच काय करावयाचें आहे, आहे तसेंच राहावें, सर्व शेवटीं व्यर्थ आहे, धडपड करणेंही व्यर्थ आहे, नशीब ठेविल त्याप्रमाणें काल कंठावा, असे कमकुवत विचार आमच्या लोकांत प्रसृत पावत आहेत, हें एक दुर्भाग्याचें दुश्चिन्ह आहे.

अगदीं सकाळींच गवळी दुधाच्या बाटल्या घराच्या दारांत ठेवून जातो, तसेंच वर्तमानपत्र वांटणारा पोऱ्याही वर्तमान पत्र ठेवून जातो. रस्त्यावरील

तिऱ्हाईत माणूस या सामानास हात लावीत नाहींत. येथील नोकरवर्ग फार इमानी वाटला. खोलींत घड्याळ, पैसे, नोटा वगैरे वस्तु टेबलावर टाकून खुशाल बाहेर जा, त्यांतून चोरीस कांहीं जाईल अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

इंग्रज स्त्रिया काम करीत नाहींत अशी आमची खोटी समजूत झालेली आहे. स्त्रिया दिवसभर कांहीं ना कांहीं काम करीत असतात. आठवड्यांतून एक दिवस भाराभर कपडे धुतात. स्वयंपाकांत मात्र यांचा फार वेळ जात नाहीं. कारण यांना खाद्य पदार्थ नुसते उकळत ठेवण्याचे किंवा तळून काढावयाचे असतात. एक वाजावयाचे सुमारास दुपारच्या लंचची ( जेवण्याची ) वेळ; बरोबर यावेळीं शहरांतील सर्व लोक जेवणांत गुंतलेले दिसून येतील. ही वेळ सर्व युरोपभर एकच ठरलेली आहे. आपल्या इकडे सकाळीं नऊ पासून दुपारीं एक दीड पर्यंत जेवण निरनिराळया वेळीं चालू असतें तसें विलायतेंत नाहीं. नियमित वेळींच त्या वेळचे पदार्थ मिळावयाचे. या वेळेशिवाय मध्यें कांहीं पदार्थ पाहिजे म्हटल्यास हॉटेलसमधून स्वच्छ नकार मिळावयाचा. खोलीच भाडें आणि जेवण मिळून आम्हांला अडीच-तीन पौंड खर्च येई. सर्वच पदार्थ विलायतेंत महाग पडतात. कपड्यांची धुणावळसुद्धां इकडील पांचसहा पट ! चार वेळच्या धुणावळींत हिंदुस्थानच्या शर्टची किंमत निघून जावयाची. मोजे व हातरुमालाला जवळ जवळ तीन पेन्स म्हणजे दोन आणे पडावयाचे. खर्चाला कंटाळून कधीं कधीं बाथरूममध्यें मी माझे हातरुमाल साबणांनीं धुवून काढीत असे ! इंग्रजी जेवणाचा कंटाळा आला म्हणजे अधून-मधून आम्ही हिंदुस्थानी खाना म्हणजे, खिचडी, पापड, भाज्या, प्यानकेक्स ( पोळया ) करून एकाद्या वेळेस मित्रास जेवणाचें आमंत्रण देत होतो. पापड यांना फारच आवडत ! चांगले टोमॅटो सरासरी आठ दहा आण्यास अच्छेर मिळत. याचें कारण कांचेचीं गृहें बांधून त्यांतून यांना अशा भाज्यांची लागवड करावी लागते. खाण्याचे बहुतेक पदार्थ इंग्लंडांत परदेशांतून येतात. दक्षिण फ्रान्समधून भाज्या, डेन्माकमधून चीज, लोणी, मांस तर कॅनडा मधून गहूं आणि अमेरिकेहून मोसंबीं ! आठ दिवस जर बाहेरून कांहीं माल न आला तर आम्ही उपाशीं मरूं असें पुष्कळ वेळां हे लोक म्हणतात. येथील या लोकांचें जीवन मुख्यतः व्यापारावर अवलंबून आहे. सर्व उत्पादक धंद्यांतून स्त्रियांनाही कामें करावयाची

मोकळीक आहे. दुकानांतून, हॉटेलांतून, सिनेमागृहांत, पोस्टऑफिसांत जिकडे तिकडे स्त्रिया कामें करीत असलेल्या नजरेस पडतात. सरकारी दप्तरांतून कारखान्यांतून कारकुनाच्या जागेवर व टाईपरायटरच्या जागेवर स्त्रियांचा भरणा मोठ्या प्रमाणांत आहे. शक्तीचीं बोजड कामें मात्र स्त्रियांकडे सोंपविलीं जात नाहींत. इमारतीचें बांधकाम स्त्रिया कधींच करीत नाहींत. घरगुती स्त्रिया काम आटोपल्यावर दुपारचा वेळ वाचनांत वगैरे घालवितात. त्या सार्वजनिक कामांत भाग घेतात, इतकेंच नव्हे तर पार्लमेंटच्या चढाओढींतही भाग घेतात. थिऑसाफिकल सोसायटीचें बरेंच प्रस्थ वेल्श स्त्रियांत माजलेलें दिसून आलें. तसेंच S. P. C. A जीवदया संघाचेंही प्रस्थ बरेंच आहे. मी माझ्या मालकिणीस नेहमीं प्रश्न करीत असे कीं, ' तुम्हीं जनावरांना दुःख देऊं नये अशा मताच्या आहांत, मग मांजरी व्याली तर तिचीं पिलें त्याच दिवशीं मारून कां टाकतां ? " ती म्हणे " घर स्वच्छ ठेवावयाचें तर असेंच थोडें निर्दयही बनावें लागतें ! नाहीं तर घरांत सारीं मांजरीचीं पिलेंच व्हावयाचीं. "

शकुन अपशकुनाच्या कल्पनाही वेल्श लोकांत समूळ नाहींशा झाल्या नाहींत. घुबड आणि काळें कुळकुळीत मांजर शुभ, तर घरांत छत्री उघडणें हे लोक वाईट, अशुभ मानतात !

## इंग्रज लोकांचे कांहीं गुण

इंग्रज लोकांचे अनेक गुण आपणांस शिकण्यासारखे आहेत. वक्तशीरपणा आणि शिस्त हे गुण तर त्याच्या हाडींमासीं खिळलेले दिसून येतात. कसलेंही साधें काम असो त्यांत आपणांस शिस्त पहावयास सांपडते. याची कांहीं उदाहरणें मी पूर्वी दिलीं आहेतच. शिस्त रहावी म्हणून थोडीशीं बंधनें या लोकांनीं आपणांवर लादून घेतलीं आहेत. नाटकगृहाचें तिकिट विकत घ्यावयास तासचेतास दूरवर लोकांना थांबावें लागतें. पण असें थांबणें श्रेयस्कर असतें. कितीही त्रास झाला तरी हा साधा नियम मोडावयाचा नाहीं असा जणूं काय त्यांनीं मनांत पक्का निश्चयच केलेला असतो. शिस्त इतकी अंगवळणीं पडली आहे कीं पांच सात इंग्रज लोक रस्त्यावरून चालूं लागले तर सहजगत्या त्यांचीं पावलें सारखीं पडूं लागतात.

आपल्याकडील रस्त्यावरून चालणाऱ्या लोकांस पाहिलें कीं, बरोबर दावें तुटलेल्या गुरांचीच कल्पना माझ्या डोक्यांत घोळूं लागते. त्यांतून कपड्यांतील विषमतेमुळें कधीं कधीं थोडासा हास्यरसही उत्पन्न होणें शक्य होतें. विलायतेंत रस्त्यांतून फार मोठ्यानें बोलत जाणेंसुद्धां चांगलें समजत नाहींत तर आपल्याकडे याच्याउलट रस्त्यांतून सर्व तऱ्हेची ओरड व हातवारे नेहमीं दिसून येतात. एकंदरींत बाजूस बसलेल्या किंवा चालत असलेल्या लोकांससुद्धां आपल्या वागणुकीनें त्रास होऊं नये याची प्रत्येकजण दक्षता बाळगीत असतो व जर एखादे वेळेस चुकून याविरुद्ध वर्तन घडलें तर ताबडतोब माफी मागतात. वेळेची किंमत तर त्यांना आपल्यापेक्षां कितीतरी पटीनें जास्त आहे. प्रत्येक गोष्ट वेळेवर झालीच पाहिजे. जेवण, चहा, फिरणें, खेळणें, व्याख्यानें, भेटणें वगैरे कामें वेळच्यावेळीं झालींच पाहिजेत असा त्यांचा कटाक्ष असतो. त्यामुळें इकडील जीवन एखाद्या यंत्राप्रमाणें भासतें. कोणत्याही बाबतींत थोडा उशीर झाल्यास मला स्वतःची फारच फजिती झाल्यासारखें वाटत असे.

दुसरा एक वाखाणण्यासारखा गुण म्हणजे चिकाटी. त्याचप्रमाणें आपलें म्हणणें पटवून देण्याचा ते आटोकाट प्रयत्न करतात. कॉलेजांतील मुलांतही हा गुण मला विशेष दिसून आला. इतकेंच नव्हे तर या गुणाचा थोडा अतिरेकही मला दिसून आला. ‘ आम्ही म्हणतों तेंच खरें ’ असा दुराग्रह व परपक्षाचें पूर्णपणें ऐकून न घेतां आपलेंच म्हणणें गळीं उतरविण्याचा अट्टाहास, त्याचप्रमाणें त्यांच्या स्वभावांत आढयता फार दिसून येते. अर्थात् प्रत्येक गोष्टीस अपवाद हा आहेच. इंग्रज लोक संकटाचे वेळीं डगमगत नाहींत. कशा तऱ्हेनें संकटास तोंड देतां येईल याचा ते शांतपणानें विचार करतात. त्यांचीं मनें गोंधळून जात नाहींत. शेवटपर्यंत हे युक्त्या शोधीत असतात. त्यांची खात्री असते कीं ऐन आणीबाणीच्या वेळीं कोणी ना कोणी स्वयंस्फूर्तीनें पुढें येईल व कसलाही कठीण प्रसंग अथवा घोर संकट आलें तरी आपण त्यांतून निभावून जाऊं; आणि पुष्कळ वेळां असें होतेंही ! आपण या गुणास हवे तर आत्मविश्वास म्हणूं !

देशाभिमान तर त्यांच्यांत पूर्णपणें भरलेला दिसून येतो. देशाकरितां वाटेल तो स्वार्थत्याग करावयास हे मागेंपुढें बघत नाहींत, हें गेल्या महायुद्धाच्या वेळींच प्रत्ययास आलें. इंग्लंडविषयीं टाकून बोललेलें यांना मुळींच खपत नाहीं.

देशाभिमानाबरोबर प्रांताभिमानही बराच वाढलेला मला दिसून आला. "रूल ब्रिटानिया "चा दिवसही हे लोक मोठया उत्साहानें पाळतात.

## इंग्रज आणि वेल्श

इंग्रज आणि वेल्श लोकांत थोडीशी तेढ दिसून येते. इंग्रज लोक वेल्श लोकांना थोडे कमी सुसंस्कृत समजतात. वेल्श भाषा कानाला कठोर लागते म्हणून इंग्रज मनुष्य या भाषेंत बोलणाराची थोडी थट्टा करतो. वेल्सचे लोक मोठे भाषाभिमानी ! एका वेल्श पुढाऱ्याचें आमच्या कॉलेजांत ता. १९ ऑक्टोबर १९३० ला एक व्याख्यान झालें. मि. सँडर्स लुईस हें त्याचें नांव होतें. इंग्रजां-वर त्यांनीं स्वार्थीपणाचा आक्षेप घेतला होता; आणि वेल्श संस्कृतीची नासाडी इंग्रजांनीं केली; इंग्रज धूर्तपणानें वेल्सवर सत्ता गाजवीत आहेत असें त्याचें म्हणणें होतें. वेल्समधील मोठमोठ्या अधिकाराच्या जागेवर इंग्रजांच्या नेमणुका, तेथील मोठमोठ्या कोळशाच्या खाणीचे मालक इंग्रज, अशी स्थिति होऊन बसली. इत्यादि. या पुढाऱ्यानें शेवटीं 'वेल्सकरितां निराळें पार्लमेंट पाहिजे.' हा मुद्दा मांडला होता. वेल्सच्या लोकांना मुठींत दाबून धरण्याकरितां इंग्रज कशा नानाप्रकारच्या युक्त्या योजितात हें सप्रमाण व कांहीं इंग्रज पुढाऱ्यांचीं पत्रें वाचून दाखवून सिद्ध केलें होतें. इंग्रज हिंदुस्थानच्या लोकांना जेव्हां सांगतात कीं, हिंदुस्थानांत अनेक भाषा आहेत, अनेक पंथाचे लोक आहेत तेव्हां त्यांना स्वतःच्या डोळयांतील मुसळ दिसत नाहीं.

वेल्समध्यें स्वराज्याची चळवळ बरीच फोंफावली होती. इतकी कीं, 'कर्नारव्हन' कॅसलवर वेल्सचें निशाण असावें म्हणून वेल्श लोकांनीं मोठें आंदोलन केलें. शेवटीं या किल्ल्यावर वेल्सचें आणि ग्रेट ब्रिटनचेंही निशाण असावें असा समेट झाला. वेल्श भाषेंतून तारा वगैरे देतां येत नसत. कांहीं लोकांनीं तसे केले. आतां वेल्श भाषेंतून तारा देण्याची सोय झाली आहे. वेल्स-मध्यें अजूनही कांहीं खेड्यांतून इंग्रजी अगदींच न येणारा असा एखादा म्हातारा मनुष्य भेटतो. वेल्सचे लोक इंग्लिश लोकांपेक्षां दरिद्री आहेत. स्वभा-वानें हे लोक अगदींच गरीब वाटले. इंग्रज जेवढे गंभीर व मितभाषणी तेवढेच हे लोक बोलके व थट्टेखोर दिसले. हिंदुस्थानी लोकांप्रमाणेंच पहिल्या प्रथम वेल्शमन् हवापाण्यासंबंधीं बोलणें सुरू करून संभाषणास सुरवात करतो.

हिंदुस्थानच्या राजकीय प्रश्नांसंबंधीं हे लोक फार सहानुभूति दाखवितात. अॅबरला वेल्श गॅझेट नांवाचें वेल्श भाषेंतील वर्तमानपत्र प्रसिद्ध होतें. त्यांतून या विषयावर लेखही येत असत. अर्थात् असा लेख आला म्हणजे वेल्श मुलें आम्हांला अर्थ सांगत. वेल्सचा ‘ राष्ट्रीय दिन ’ वेल्श लोक मोठ्या उत्साहानें पाळीत. डॅफोडिल हें फूल राष्ट्रीयत्वाचें सूचक समजलें जातें. या दिवशीं शहरांतून मोठी मिरवणूक निघते. प्रत्येकाच्या कोटावर हें फूल लाविलेलें दिसावयाचें आणि या दिवशीं प्रत्येकाच्या चेहऱ्यावर राष्ट्रीय आनंद आणि उत्साह विलसत असलेला दिसून येतो. दक्षिणवेल्स मधील कोळशाच्या खाणींतून काम करणें हा मजुरांचा मुख्य धंदा आहे. या कामगारांना अत्यंत मेहनतीचें काम करून सुद्धां मुबलक पैसा मिळत नाहीं. कोळशाच्या खाणींच्या कपारी ढांसळून पुष्कळ वेळां काम करणारे शेंकडों मजूर प्राणास मुकतात. या मजुरांना गरिबीमुळें गरम कपडे व बूट मिळत नाहींत. म्हणून अॅबर येथें एकदां Miners' Day मजुरांचा दिन पाळण्यांत आला. जुने बूट, गरम कोट, ओव्हर कोट, जुन्या हॅटस् वगैरे दान देण्याजोग्या वस्तू असतील त्या अमुक तारखेस काढून ठेवाव्यात ’ असें आम्हीं जाहीर केलें होतें. त्या दिवशीं कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं नाना तऱ्हेचीं सोंगें घेऊन गांवांतून एक मिरवणूक काढली आणि प्रत्येक घरांतून सामान गोळा केलें व खाणींतील कामकऱ्यांना पाठवून दिलें. मजूरांनीं आम्हांला फार धन्यवाद दिले.

## गाय फॉक्स डे

कॉलेजांतील मुलांची गंमत अशी कीं, अभ्यासाचे वेळीं पूर्ण लक्ष लावून त्यांचें अध्ययन चालतें पण इतर वेळीं हीं इतका वांडपणा करतात कीं कांहीं विचारूंच नये. प्रतिवर्षी नोव्हेंबरच्या ५ व्या तारखेस ‘ गाय फॉक्स डे ’ पाळण्यांत येतो. इंग्लंडांत १७ व्या शतकाच्या आरंभीं रोमन कॅथॉलिक लोकांचा छळ चालू होता. इंग्लंडच्या बाहेरूनही या लोकांना मदत मिळेना. शेवटीं त्रस्त होऊन रॉबर्ट कॅट्स्बी याच्या नेतृत्वाखालीं येथील लोकांनीं जेम्स राजा व पार्लमेंट उडवून टाकण्याचा निश्चय केला. शिकारीचें सोंग करून शस्त्रास्त्रें गोळा केलीं. आणि गुप्तपणें दारूगोळा पार्लमेंटच्या तळमजल्यांत गोळा करून ठेविला. फितुरीची जय्यत तयारी झाली असतां आपल्या नातेवाइकास

बचावण्याकरितां कटांतील एका माणसानें एक पत्र पार्लमेंटमधील मेंबरला लिहिलें. ' गाय फॉक्स ' दारुगोळयास बत्ती लावणार एवढ्यांत ही गुप्त बातमी फुटली. फितूर झालेल्या लोकांचा पाठलाग करण्यांत आला. आणि यांना फांशीं देण्यांत आलें. याची नक्कल ' गाय फॉक्स डे ' या दिवशीं करण्यांत येते.

५ व्या नोव्हेंबरला कॉलेजांत Mock Parliament भरविण्यांत आलें. खालच्या तळघरांत टोपलीच्या टोपली फटाके, फुलबाजे, सुरुंग इ. भरून ठेविले होते. गाय फॉक्सला धरुन समुद्रकांठावर नेण्यांत आलें. ज्या लोकांनीं कटांत भाग घेतला त्यांना केळीच्या सोपटांनीं खूप मार देण्यांत आला, व शेवटीं गाय फॉक्सची कत्तल करण्यांत आल्याचें जाहीर करण्यांत आलें.

## क्रिसमस

१९२८ चा क्रिसमसचा आठवडा लंडन येथें घालवावा असें मी ठरविलें व त्याप्रमाणें लंडनला गेलों. क्रिसमस हा इंग्रजांचा सर्वांत मोठा सण. जिकडे तिकडे आनंदी आनंद. प्रत्येकास हर्षवायु झाला आहे कीं काय असें वाटतें. रंगीबेरंगी कागदांच्या कातकामानें घरें सुशोभित केलेलीं होतीं. भर थंडीचे हे दिवस, भोंवतालीं बर्फ पडलेला ! पण सर्वांच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा तजेला दिसत होता. सुट्या असल्यामुळें तर सर्वांच्या खेळाडू वृत्तीला जणूं काय ऊतच आला होता. सकाळीं बिछान्यांतून उठतांनाच ' क्रिसमस कॅरोल ' गाणें म्हणत जात असतांना रस्त्यांतून दिसलें. या दिवशीं Happy xmas to you असें जो भेटेल त्याला म्हणावयाचें व दुसरेही याच वाक्याचा पुनरुच्चार करतात. आपल्या ओळखीच्या माणसास क्रिसमस कार्डस् पाठवितात. पोष्टाचें काम इतकें वाढतें कीं पोष्टखात्यांत बरेचसे स्पेशल पोष्टमन नेमावे लागतात. मित्रमंडळींकडून आलेलीं क्रिसमस कार्डें दिवाणखान्यांत रांगेनें लावून ठेवितात. व घरचे लोक मोठ्या आढ्यतेनें सांगतात कीं, ' हे पहा, आमचा मुलगा आफ्रिकेंत काम करतो त्यानें हें पाठविलें. हें दुसरें आमच्या मुलीचें न्यूयॉर्कहून आलें ! ' घरांतील मुलेंही खूपच आनंदांत असतात. कारण या दिवशीं सकाळीं उठतांच खेळणीं भरून ठेविलेली पिशवी त्यांना आपल्या बिछान्यांत सांपडते. मुलें विचारतात, " कोठून आली ही पिशवी ? " आई सांगते,

"रात्रीं फादर क्रिसमसनें आणून ठेविली." माझ्या बिछान्यांतही अशीच एक पिशवी घरच्या मालकिणीनें आणून ठेविली होती. या दिवशीं प्रेझेंटस्‌ची खूप देवाण घेवाण चालू असते. मी सकाळीं न्याहारी झाल्यावर प्रेझेंटस् देण्याच्या वस्तू खरेदी करावयास गेलों. तों लंडनच्या रस्त्यावर अतोनात गर्दी. स्त्रीपुरुषांना खांदे घासून मार्ग काढावा लागतो. मधून मधून लाल डगले घालून, लांब पांढरी स्वच्छ दाढी लावलेली "सांताक्लाज" फादर क्रिसमसचीं सोंगें फिरत होतीं. त्यांच्या भोंवतीं लहान मुलांची गर्दी असते. रस्त्याच्या दुतर्फा तीन चार मजली दुकानें मालांनीं भरगच्च भरलेलीं होतीं. लहान मुलाप्रमाणें प्रत्येक वस्तू मला घ्यावीशी वाटली. पण मी मनांत म्हटलें, 'कुबेराच्या वाड्यांत दारिद्र्याचें पाऊल!'

कित्येक दुकानांत वरच्या मजल्यावर जाण्यास फ्री लिफ्टस होते. माल घ्या किंवा न घ्या दुकानें फिरून येण्यांतच मला मौज वाटूं लागली. बरें, चार मजली दुकानांत इकडे तिकडे फिरून कंटाळा आला कीं वरच्या बाजूलाच चहा कॉफीची व्यवस्था होती. पाय थकेपर्यंत व पैशाचें पाकीट हलकें होईपर्यंत फिरून मी घरीं आलों. क्रिसमसच्या दुपारच्या जेवणांत टर्की आणि क्रिसमस केक हे पदार्थ ठरलेले असत. टर्की हा एक मोठा बगळयासारखा पक्षी असतो. त्याला क्रिसमसच्या अगोदर खूप खाऊं घालून लठ्ठ करतात. अशा मोठ्या टर्कीची किंमत दोन पौंडपर्यंत असते.

जेवण आटोपून लोक उठले. एक तरुणी चुकून किंवा मुद्दामच 'मिसलटो' खालीं उभी राहिली. पटदिशी एक तरुण उठला आणि त्यानें तिचें चुंबन घेतलें. या दिवसांत घराच्या दारांतून किंवा बसावयाच्या जागीं 'मिसलटो' नांवाच्या झाडाच्या फांद्या टांगून ठेविलेल्या असतात. याच्या खालीं कुणी उभें राहिलें कीं चुंबन घेण्यास परवानगी! शेवटीं एका खट्याळ तरुणानें डाव्या हातांत मिसलटोची फांदी घेऊन प्रत्येक तरुणीच्या डोक्यावर धरून चुंबनें घेण्याचा सपाटा चालविला! अशा प्रकारास हे लोक गर्ह्य समजत नाहींत! उलट हंसण्या-खिदळण्याचा एक मनोरंजक भाग समजतात. पिणें, नाचणें आणि गाणें या दिवसांत सारखें चालूं असतें. इकडे मदिरादेवीचें भयंकर प्रस्थ आहे. मी एका गृहस्थास भेटावयास गेलों. मेडनें बाहेरून कळविलें कीं, 'He is Keeping Xmas.' (साहेब पिऊन तर्र पडले आहेत) ३१ डिसेंबरची रात्र म्हणजे

आनंदाचा कळस! लंडनच्या सर्व रस्त्यावर दिव्यांची आरास केलेली. मोठमोठ्या चौकांत चोहोंकडून टॉर्चलाइट सोडलेले. रस्त्यांत सुद्धां चुंबनांची लयलूट. आमच्या पैकीं एकाची तर फारच गाळण उडाली. हा थोडा काळसर होता. एका अनोळखी बाईनें त्याचें चुंबन घेतलें व म्हटलें कीं, "काळया माणसाचें चुंबन आज घेणें आमच्याकडे फार शुभ समजलें जातें. आतां आमचें पुढील वर्ष फार आनंदांत जाईल." लंडनच्या नृत्यालयांतून अनेक स्त्रीपुरुष नाच करीत असलेले दिसले. या दिवशीं रात्रीं बरोबर १२ वाजतां स्त्रीपुरुष हातांत हात धरून मोठी कडी करतात व गतवर्षाचें आनंदानें विसर्जन करून येणाऱ्या वर्षाचें अभिनंदनपर गाणें गातात. क्रिसमसनंतर मी आपल्या गांवी ॲबर येथें गेलों.

## वडिलांचें विलायतेस आगमन

निरनिराळे देश पाहाण्याचा विचार वडिलांच्या मनांत फार दिवसांपासून घोळत होता. प्रकृति सुधारण्याच्या दृष्टीनेंही त्यांचें युरोपांत येणें फायदेशीर होतें. मींही पण पत्रांतून तसा आग्रह केला होता. अखेर श्री. गुरुवर्य धोंडो केशव कर्वे यांच्या बरोबर माझे वडीलही विलायतेस निघाले. १९२९ च्या एप्रिल महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत ते लंडनला पोंचले. माझ्या धाकट्या बंधूकडे दोन आठवडे राहून पुढें माझ्याकडे आले. उतार वयांत इतक्या लांबच्या प्रवासावर निघण्याच्या त्यांच्या धैर्याचें मला राहून राहून आश्चर्य वाटूं लागलें. ॲबर येथें मिसेस लूइसकेड टालिमा नांवाच्या घरांत मी आणि चंद्रभान सिंघाल रहात होतों. वडिलांचें इंग्रजी साधारण होतें. ते सिंघाल बरोबर तासचे तास हिंदींत बोलत बसत. हिंदी विद्यार्थी आपापसांत हिंदींतूनच बोलण्याचा आतांशा प्रघात पडूं लागला आहे. त्रावणकोरचा एक विद्यार्थी बाळकृष्ण मेनन आणि बंगालचे विद्यार्थी देखील मोडक्या हिंदींतूनच बोलण्याचा प्रयत्न करीत. माझे वडील सकाळच्या चहानंतर फिरावयास जात. दुपारीं विश्रांति व संध्याकाळीं हिंदी विद्यार्थ्यांबरोबर पुन्हां फेरफटका करीत. गु. अण्णासाहेब कर्वे निरनिराळ्या शिक्षणसंस्था पहावयास लंडनहून निघून गेले होते. त्यांची एक गोष्ट माझे वडील सांगत. बोटीचा प्रवास संपल्यावर स्टुअर्डला इनाम द्यावा लागतो. गु. अण्णासाहेब कर्व्यांनीं ५ शिलिंग काढले व स्टुअर्डला त्याचें नांव

विचारून म्हणाले, "हें पहा, मी एक गरीब हिंदुस्तानी मनुष्य आहे. माझी एक शिक्षण संस्था पुण्यास आहे. त्या संस्थेला मदत म्हणून हे पांच शिलिंग तुझ्याकडून घेतों. ही रसीद घे." स्टुअर्डनें श्री. कर्व्यांचे आभार मानिले.

इतकी कळकळ संस्थेसंबंधीं असावी तेव्हां कोठें संस्थेस उर्जितावस्था येते असें माझे वडील म्हणत. वेल्श युनिव्हर्सिटीकडूनही आम्हीं कांहीं पौंड मदत म्हणून गु. कर्वे यांचेकडे पाठवून दिले होते.

माझे वडील अण्णासाहेब (ना. न्या. मू. केशवराव) यांचें निरीक्षण तीव्र होतें. ॲबर येथील वेल्श नॅशनल लायब्ररी पहावयास ते गेले होते. तेथील व्यवस्थापकांनीं १५।२० फूट लांब असें एक रामरावण युद्धाचें चित्र दाखविलें आणि व्यवस्थापक सांगूं लागले कीं हें चित्र कमींत कमी इ. स. पूर्वी सात आठ शतकापूर्वीचें आहे ! वडिलांनीं प्रश्न केला कीं 'हें चित्र येथें कसें आलें ?" व्यवस्थापकानें म्हटलें– 'एका वेल्श सोल्जरनें हें लायब्ररीस दिलें आहे, त्यानें हें चित्र हिंदुस्थानांतून येतांना आणिलें होतें. वडिलांनीं या चित्राकडे थोडे निरखून पाहिलें व ते म्हणाले. 'हें चित्र आपण म्हणतां येवढें जुनें मुळींच दिसत नाहीं. रामरावण युद्धाचे वेळीं शिपाई फिरंगी टोप्या घालीत नसत, व त्याकाळीं बंदुकीपण नव्हत्या. तेव्हां इंग्रज हिंदुस्तानांत आल्यानंतरचें हें चित्र असावें." व्यवस्थापकांनीं ही गोष्ट लगेच नोट करून घेतली.

## लॅंपीटर

लॅंपीटर येथें एक रग्बी मॅच पहावयास माझ्याबरोबर वडीलही निघाले. मोटरबस भरगच्च भरली होती. विलायतेंत स्त्रीपुरुष हा भेद मानण्यांत येत नाहीं. तरुण बायका अखेर तरुण पुरुषांच्या मांडीवर बसल्या. कम्यूनिटी सिंगिंग सुरू झालें. हंसणें खिदळणें सुरू होतेंच. हा प्रकार पाहून वडिलांस प्रथम विचित्र वाटलें. पण शेवटीं ते म्हणाले, "यांत वावगें असें काय आहे ? अशा आनंदी वातावरणानें उलट उत्साह वाढतो." मॅचच्या ठिकाणीं बस उशीरा गेली. तिकिटें संपलीं होतीं. वरून पिठूळ बर्फ पडत होता. मला वाटलें यांना उगीच त्रास दिला. पण वडील म्हणाले, "या खेळ्यांतील मॅच पाहण्यांत सुद्धां एकप्रकारची मौज आहे, नाहींतर मी आलों कशाला ?" मॅच पाहून आम्ही ॲबरला परत फिरलों. हिंदुस्तानी विद्यार्थ्यांबरोबर वडील निरनिराळया विषया-

वर चर्चा करीत बसत. हिंदी ही राष्ट्रभाषा होणें इष्ट आहे किंवा नाहीं ! आपल्या देशाला तुम्ही लोक पुढें कसें आणणार ? इंग्रजांची विभक्त कुटुंब-पद्धति बरी किंवा आपली अविभक्त कुटुंबपद्धति बरी ? इतकेंच नव्हें तर, इंग्रज मुलींशीं लग्न करण्यासंबंधींही त्यांनीं मुलांचीं मनें चाळून पाहिलीं. एकादे वेळीं प्रौढ विवाहांतील गुणदोषाचें विवरण होई तर कधीं धर्मांतरासारख्या विषया-संबंधींही विचारविनिमय होई.

## चर्च ( गिरजा घर )

रविवारीं शाळा कॉलेजें व ऑफिसेंही बंद ठेविलीं जात असल्यानें या दिवशीं कसें चुकल्या चुकल्यासारखें होई. सकाळीं आठाच्या सुमारास सर्व लोक उत्तम उत्तम कपडे करून प्रार्थनेस जातात. एका रविवारीं वडील व मी दोघेही चर्चमध्यें जाऊन तेथील सार्वजनिक जागेंत बसलों. चर्चेसमधून आपापल्या जागेचें भाडें द्यावें लागतें आणि प्रार्थनेनंतर टोपी फिरवितात, त्यांत कांहीं तरी दक्षिणा म्हणून मदत टाकावी लागते. आठवड्यांतून एक दिवस धार्मिक कर्तव्य म्हणून हे लोक चर्चेसमधून जातात, त्यांत भाविकपणाचा अंश कमीच असतो, असें आम्हांस वाटतें. आपल्या देशाप्रमाणें धर्माचें प्राबल्य इकडे इतकें माजलेलें नाहीं. भक्तिरसाची तेवढी गोडी यांना नाहीं असें आम्हांस वाटतें. बहुतेक सारेच लोक कांचनभक्त ! पुरुष आणि स्त्रिया सर्वांनाच अतोनात द्रव्यप्राप्तीची लालसा लागून राहिलेली दिसून येते. कल्पनातीत पैसा मिळवावा, जग पहावें, खूपशी मौज करावी हेंच सर्व साधारण व युरोपांतील माणसाचें तत्त्वज्ञान असावें असें वाटतें. अर्थात् लेखक, कवि, तत्त्ववेत्ते आणि राज्यशास्त्रज्ञ इकडे नाहींत असें म्हणावयाचा माझा उद्देश नाहीं. सर्वसाधारणपणें पाहूं गेलें असतां युरोपांतील बहुजन समाज पैशाचा पूजक आहे असें माझें ठाम मत बनलें. जितका जास्त पैसा मिळवावा तेवढें अधिक सुख प्राप्त होतें असें यांना वाटतें. या कल्पनेमुळें हे लोक सतत कमावण्याच्या शोधांत असतात; आणि सांपत्तिक स्थिति सुधारा-वयास अतोनात धडपड करितात. हाही एक यांचा सद्गुणच नव्हे तर काय ?

## पार्टी

वडिलांना लौकर हिंदुस्थानांत परत जावयाचें होतें म्हणून त्यांच्या सन्मानार्थ

एक पार्टी द्यावयाचें ठरलें. क्वीन्स् हॉटेलमध्यें डिनरची व्यवस्था केली. इंग्रज व वेल्श मित्र मैत्रिणींना आमंत्रणें दिलीं होतीं. इकडील पद्धतीप्रमाणें डिनर संपतांच एका गृहस्थानें पियानो वाजवावयास सुरुवात केली व इतर मंडळी जोड्या जोड्या करून नाचूं लागली. मी वडिलांशीं बोलत बसलों होतों. एवढयांत मि. सिंधाल आले व ते वडिलांस म्हणाले, 'विठ्ठलभी बहोत अच्छा डान्स करता है, अगर आप उसको इजाजत दें तो वह भी डान्स करेगा " वडिलांनीं ताबडतोब परवानगी दिली व मी भीत भीतच आपलें डान्सचें प्राविण्य दाखवूं लागलों. रात्रीं घरीं आल्यावर बराच वेळ या विषयावर चर्चा झाली. डान्स वगैरे इंग्रजी उन्मादक चालीरीतींत आपण भाग घ्यावा किंवा अलिप्त रहावें, परस्त्रीला स्पर्श करणें सुद्धां हिंदी संस्कृतींत चांगलें समजलें जात नाहीं. हिंदी विद्यार्थी पुष्कळ वेळीं डान्स वगैरेच्या नादीं लागून पुढें आपलें पावित्र्य गमावून बसतात. येवढेंच नव्हे तर आपण विलायतेंत शिक्षण संपादन करण्याकरितां आलों आहोंत या गोष्टीचा सुद्धां त्यांना विसर पडूं लागतो. स्त्रियांना हातांशीं धरून नाचण्यानें मन चंचल होतें. त्यांतून इंग्रज स्त्री पुरुषांच्या दर्शनी प्रेमाचीं चित्रें म्हणजे हातांत हात घालून चिकटून चालणें, बागेंतून किंवा डोंगरांतून तरुण तरुणींचें एकांतवासांत बसणें– वगैरे पाहून आपणही तसेंच करावें ही कल्पना साहजिकच हिंदी विद्यार्थ्यांच्या मनांत घोळूं लागते. इंग्रज तरुणांचा कित्ता गिरवून बरेच हिंदी विद्यार्थी मार्गच्युत झालेले आहेत यांत शंका नाहीं. १७–१८ वर्षांच्या मुलांना विलायतेस पाठवूं नये असेंही कांहींचें मत पडतें, पण या विरुद्ध असेंही दिसून येतें कीं, कांहीं प्रौढ विवाहित विद्यार्थीसुद्धां पिण्याच्या व स्त्रियांच्या नादीं लागून फसतात. विलायतच्या अशा वातावरणांत राहून आपला अभ्यासक्रम यशस्वी रीतीनें संपवून परत येणें म्हणजे एक दिव्यच नाहीं तर काय ? रस्त्याच्या बाजूस किंवा समुद्र किनाऱ्यावर वाळूंत पडून एकमेकांना कवटाळीत असलेली कितीतरी जोडपीं दररोज पहावयास मिळतात ! हा प्रकार आम्हांला किळसवाणा वाटे. आम्हांला वाटे कीं, या बेट्यांना घरें नाहींत कीं काय ? असले प्रकार आम्ही हिंदुस्थानांत कोणत्याही गांवीं पाहिले नाहींत. यामुळें हिंदुस्थानांत कितीहि वाईट प्रकार असले तरी अजून पूर्ण स्वैच्छाचारास आळा असल्यामुळें आमचा देश व आमची संस्कृति आम्हांला हजार पटीनें बरी वाटते. अर्थात् विलायतेंत यांत वाईट असें कांहींच

मानीत नाहींत. पवित्रपणाच्या कल्पनेंत केवढें महदंतर पडलें आहे हें ! नीति अनीतीच्या कल्पना देशांतील लोकांच्या विचाराप्रमाणें बदलतात ह्याचें आम्हांस चांगलेंच प्रत्यंतर आलें. यावरून असा कोणी कयास बांधूं नये कीं विलायतेंत साराच गलिच्छ प्रकार आहे. यांच्या सामाजिक व्यवस्थेस यांच्या चालीरीती पोषकच आहेत. यांचीं लग्नें फारच प्रौढ वयांत होतात. स्त्री-पुरुषांत भेदभाव नसतो. अठरा वर्षांची मुलगी झाली कीं ती आपणांस स्वतंत्र समजूं लागते. स्त्रिया द्रव्य संपादन करूं शकतात यामुळें त्या कोणावर अवलंबून राहात नाहींत. प्रेमोत्तर विवाहपद्धत युरोपांत रूढ असल्यामुळें, प्रेम संपादन करण्यांत तरुण तरुणींचा बराच काळ लोटतो.

स्त्री पुरुषांचा एकत्र संबंध आल्याशिवाय त्यांची मैत्री होणार कशी ? आणि मैत्रीशिवाय प्रेम उद्भूत होणार कसें ? व प्रेम नसलें तर विवाह करायचा तरी कसा ? या सर्व गोष्टींचा विचार केल्यास यांच्या डान्स वगैरे प्रकारास वाईट म्हणतांच येणार नाहीं. उलट हे प्रकार त्यांच्या जीवनास पोषकच आहेत असें दिसून येतें. विलायती विचार व विलायती प्रकारांना हंसण्यांत व एकदम त्यांना अतिवाईट लेखण्यांत कांहीं अर्थ नाहीं. हिंदुस्तानांत विवाह कसे होतात हें त्या लोकांनीं जेव्हां आमच्याकडून ऐकिले तेव्हां ते लोक पोट धरून हंसूं लागले ! ज्या स्त्रीची आणि तुमची पक्की ओळख होत नाहीं तिच्याशीं तुम्ही लग्न करतां तरी कसें ? असा प्रश्न हे लोक आम्हांस विचारीत. अर्थात् स्त्रीपुरुषांच्या दाट ओळखी होऊन आपापली निवड करून विवाहबद्ध होणें इष्ट किंवा पत्रिका पाहून, कुटुंबाची सुस्थिति व इस्टेट वगैरे पाहून वडील मंडळींनीं "जोडा छान दिसतो" म्हटल्यावर अक्षता पडून विवाहबद्ध होणें इष्ट याचा निर्णय वाचकांवरच तूर्त सोंपविणें बरें. कारण प्रेमोत्तर विवाहपद्धतींत सुद्धां किती जोडपीं खरोखर सुखी होतात, हेंही पाहिलें पाहिजे. विलायतेंत विवाहपद्धत कशी आहे हें निर्दिष्ट केलें म्हणजे पुरें आहे.

१९२९ च्या एप्रिलच्या ३ ऱ्या तारखेस वडील हिंदुस्तानांत जावयास निघाले. मी त्यांना स्टेशनवरच निरोप दिला. माझ्या संबंधीं त्यांचें काय ग्रह झाले असतील, त्यांना काय वाटत असेल, वगैरे विचार माझ्या मनांत घोळूं लागले. स्टेशनवर निरोप देतांना, या जगांतील त्यांची व माझी ही शेवटचीच भेट, अशी कल्पना सुद्धां माझ्या मनाला शिवली नाहीं.

## इंग्लिश पुढाऱ्यांचीं व्याख्यानें व लेख

मोठमोठ्या इंग्रज पुढाऱ्यांचीं व्याख्यानें ऐकावयाची मला फार हौस होती. लॉइड जॉर्ज यांचें भाषण ऐकावयाची इच्छा तशीच राहून गेली. लोक असें सांगत कीं, त्यांचें भाषण म्हणजे जणूं काय विजेच्या ठिणग्याच वाटत! बोलतांना लॉइड जार्ज यांना भयंकर स्फुरण येत असे. पण या व्यक्तीविषयीं खुद्द वेल्श लोकांत दुमत होतें. वेल्सचे जहाल पुढारी यांना पाण्यांत पहात. कारण लॉइड जार्ज निर्भेळ वेल्स स्वातंत्र्याच्या विरुद्ध होते. वेल्स देशाला लॉइड जार्ज यांनी इंग्लंडच्या घशांत घातलें म्हणून वेल्श जहाल पुढारी त्यांच्या-वर जळफळत असत.

इंग्लंडचे या काळांतील मुख्य प्रधान मि. बाल्डविन यांचें एक व्याख्यान आमच्या कॉलेजांत ऐकावयाची संधि मिळाली होती. त्यांचें व्याख्यान वाङ्मया-त्मक विषयावर होतें. रोमन व ग्रीक संस्कृतीचा इंग्रजी वाङ्मयावर कसा परिणाम झाला हें त्यांनीं विस्तृत करून दाखविलें होतें. जागतिक राजकारणाच्या घडामोडींत, वरील सारख्या विषयाचा सखोल अभ्यास करावयास यांना वेळ तरी कसा मिळतो याचें मला आश्चर्य वाटलें. कारण व्याख्यानांत त्यांनीं कित्येक ग्रीक व लॅटिन पुस्तकांचा हवाला आपल्या मतपुष्टीकरणार्थ दिला होता.

मि. बाल्डविन आलेल्या दिवशीं प्रत्येक विद्यार्थ्यांच्या हातीं एक एक पाइप (चिलीम) होती! विद्यार्थ्यांनीं फंड गोळा करून हजारों पाइप मागविल्या होत्या. येणाऱ्या पाहुण्याची सविनय थट्टा करावयाचा हा एक प्रकार आहे!

सर जोसूआ स्टँप यांचें व्याख्यान दि. ६ मार्च १९३० रोजीं अर्थशास्त्रावर मीं ऐकिलें. १९१४ च्या महायुद्धानंतर युरोपांतील आर्थिक परिस्थिति कशी ढांसळून गेली, जर्मनीच्या मार्कस नाण्याची पड कशी झाली, हजारों मार्क्स देऊन एक कप चहा मिळत नसे. युद्धानंतर अशी परिस्थिति निर्माण होण्याचीं कारणें व ती न होऊं देण्याचे उपाय, वगैरे विषयांवर यांनीं प्रकाश पाडला. ' हिंदी स्त्री म्हणजे एक चालती बोलती बँक, कारण हिंदी स्त्रियांच्या अंगावर सोन्या मोत्यांचे दागिने फार असतात' असा शेरा यांनीं मारला होता. यामुळें हिंदी विद्यार्थी थोडे चिडून गेले होते. आम्ही सर स्टँप यांना भेटून हिंदुस्थानच्या गरिबीचें चित्र त्यांच्या समोर रेखाटलें, तरी ते मानीनात. ते

म्हणत, "हिंदी स्त्रियांनीं आपली दागिन्याची किंमत व्यापारांत गुंतविली पाहिजे. इतकें सोनें अंगावर वापरल्यानें व्यापारांत मुद्दलाची तूट पडते." अखेर पर्यंत आम्हांला हें मत पटलें नाहीं. आम्हीं पुष्कळ सांगितलें कीं, सर्व हिंदी-स्त्रियांजवळ आपण म्हणतां इतके दागिने नसतात. तरी सर साहेबांना हें पटेना.

यानंतर सर ऑास्टिन चेंबरलेन यांचें "ब्रिटिश आंतरराष्ट्रीय राजकारण" या विषयावर व्याख्यान ऐकावयाची संधि मिळाली. या दिवशीं व्याख्यात्यांची विद्यार्थ्यांनीं भयंकर चेष्टा केली. चेंबरलेन स्टेशनवर उतरले तों त्यांच्याच उंचीचा व जवळ जवळ त्यांच्याच सारख्या दिसणाऱ्या एका विद्यार्थ्यास चेंबरलेन ह्यांच्या सारखा पोषाख चढविला. सर्व विद्यार्थ्यांच्या नाकावर एक कांचेचा चष्मा लावलेला होता! हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून आम्हाला फेटे बांधून स्टेशनमध्यें उभें करण्यांत आलें. सर चेंबरलेन यांना स्टेशनमधून एका मोटारींत घालून गांवापासून १० मैल अंतरावर नेण्यांत आलें! तेथें एका झोपडींत १०१५ विद्यार्थी लांकडें फोडावयाचें, भांडीं धुण्याचें, झाडू मारण्याचें वगैरे काम करूं लागले होते. येथें छोटे ऑफिसही तयार ठेविलें होतें. सर ऑस्टिन यांना कॉलेज दाखविण्याऐवजीं ही (Work-house) संस्था दाखविण्यांत आली! अभ्यास न करणाऱ्या विद्यार्थ्यांना येथें राबविण्यांत येतें असें सांगताच, सर साहेबांना समजून आलें कीं, ही सारी थट्टा आहे. पण त्यांनीं ही थट्टा शांतपणें सहन केली. सरसाहेबांना व्याख्यानाच्या हॉलमध्यें यावयास अर्धा पाऊण तास विलंब झाला. इकडे हॉलमध्यें तोतया सर ऑस्टिन खुर्चीवर विराजमान झाले होते. टेबलाच्या बाजूस हाडांचा सांगाडा वेडावांकडा उभा करून त्याच्या हातांत एक पाटी दिली होती. त्यावर 'British Foreign Policy is dead' असें ठळक अक्षरांत लिहिलें होतें! व्याख्यात्यांनीं विद्यार्थ्यांच्या कल्पकतेची खूप तारीफ केली. सर साहेबांनीं आपल्या व्याख्यानांत कालच्याच जर्मन शत्रूंची आज भरपूर स्तुति केलेली ऐकून आम्हांला आश्चर्य वाटलें! एकंदर व्याख्यानाचा सारांश 'जर्मनीबरोबर वैर करण्यापेक्षां मैत्रीच संपादन करावी' असा होता!

## १९२९: विद्यार्थी परिषद

एप्रिलच्या दुसऱ्या आठवड्यांत ॲबर येथें इंग्लंडांतील निरनिराळ्या विश्व-

विद्यालयांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची परिषद भरली होती. बरेच हिंदी विद्यार्थी मँचेस्टर, लंडन, शेफील्ड, ऑक्सफोर्ड, केंब्रिज वगैरे ठिकाणांहून परिषदेस उपस्थित होते. याच वेळीं पुण्यांतील माझ्या परिचयाची मंडळी श्री. भास्करराव कर्वे, श्रीमती शकुन्तलाबाई परांजपे व श्रीमती कुसुमावतीबाई जयवंत वगैरेंची भेट झाली. या वेळीं पार्लमेंटची नकली बैठक भरवून भाषणें करण्यांत आलीं. शकुन्तला परांजपे यांनीं फारच जोरदार भाषण करून "आम्ही हिंदुस्थानचा राज्यकारभार पहावयास पूर्णपणें लायक आहोंत. इंग्रजांनीं चूपचापपणें हिंदुस्थानांतून पाय काढावा." असें म्हटलें. परिषदेनंतर एक मोठें डिनर देण्यांत आलें, व त्याबरोबरच डान्सचीही व्यवस्था करण्यांत आली होती. परिषद यशस्वी रीतीनें पार पडली.

## हिंदुस्तानचा राजकीय प्रश्न आणि वृत्तपत्रें

साधारणतः अॅबर येथील हिंदी विद्यार्थ्यांना राजकारणाचें थोडें वावडेंच होतें. तरी पण मधून मधून हिंदी राजकारणासंबंधीं वृत्तपत्रकांतून जेव्हां लेख येत तेव्हां राजकारणाच्या विषयास थोडाबहुत ऊत येई. डेली मेलच्या जानेवारीच्या १३ (१९३०) मध्यें Jerry-building for a crash in India अशा मथळ्याचा लॉइड जॉर्ज यांचा लेख प्रसिद्ध झाला. हिंदुस्थानावरील इंग्लंडची पक्कड मजबूत करावी, अशा आशयाचा हा लेख होता. तसेंच Strong hand in India असा लेख व्हायकौंट ब्रेंटफोर्ड यांनीं लिहिला. A grave warning या मथळ्याचा लेख जे. एल. गारव्हिन यांनीं ( Observer 2nd nov. 1930 ) प्रसिद्ध केला. तसेंच No surrender in India ! असा अग्रलेख Daily Mail मध्यें 28-1-30 रोजीं आला. Shall we clear out of India- ( F. Britten Austin ) Sunday Pictorial 2-10-29. No Change of policy in India E. Clephan Palmer ( Daily News 6th nov. 1929 ) अशा मथळ्याचे लेखही प्रसिद्ध होऊं लागले. सर्वच लेख मोठे कडक असत. कधीं कधीं हिंदुस्थानसंबंधीं इतक्या अपुऱ्या ज्ञानावर लेख लिहिले जात कीं त्यांचें आम्हांस पोटभर हंसूं येई. असेंच एकदां 'भारत गौ परिषदे'च्या मिरवणुकीचा फोटो छापून ( Daily mail Nov. 18-1929 ) या पत्रांत The peril in India असा लेख सर रेजिनॉल्ड यांनीं प्रसिद्ध केला होता !

एकंदरींत हिंदी लोक राजकारभार चालविण्यास नालायक आहेत, हिंदुस्थानांत एकी नाहीं म्हणून इंग्रजांनीं आपला पाय काढला तर अंदाधुंदी माजेल; अशा आशयाचे हे लेख असत.

१९२९ च्या सुमारास हिंदुस्थानांत फारच खळबळ उडाली होती. हिंदी पुढाऱ्यांना अटक झालेल्या बातम्या प्रसिद्ध झाल्या म्हणजे अर्थातच थोडा क्षोभ होई. कै. लाला लजपत राय यांच्यावर लाठीचार्ज व अखेर त्यांच्या मृत्यूची बातमी आली. तेव्हां सर्वांना फार वाईट वाटलें. सायमन कमिशन निःपक्षपाती निवाडा देणार असें वृत्तपत्रांतून लिहून आलें म्हणजे थोडी आशा उत्पन्न होई. हिंदी स्वराज्य अगदीं जवळ आल्यासारखें होई तर केव्हां केव्हां दूर जात आहे तर कधीं दृष्टीआड होत आहे असें वाटे, आणि आशानिराशेचें हें नाटक आनंदपर्यवसायी होणार किंवा कसें, इकडे लक्ष लागून राही. २६ मार्च १९२९ ला महात्माजींना अटक झाल्याची बातमी आली तेव्हांही आमचीं मनें अशीच उद्विग्न झालीं होतीं.

इंग्रज राजकीय पुढाऱ्यांच्या व्याख्यानांतून बहुतेक हिंदुस्थानसंबंधीं कांहींना कांहीं पर्यालोचन केलेलें असेच, येवढेंच नव्हे तर, चर्चेसमधून प्रार्थनेच्या नंतर देखील "हे परमेश्वरा, आमच्या हिंदी प्रजेचें कल्याण होवो. हिंदीराजकारणाच्या लढ्यांत समेट घडून येवो. परमेश्वरानें हिंदुस्थानच्या हिताची जी जबाबदारी आम्हांवर लादली आहे ती आमच्या हातून चांगल्या रीतीनें पार पडो." अशी प्रार्थना आमच्या कानांवर येई. आम्हांलाही इंग्रजांची कींव येई. आम्हीं म्हटलें 'हें केवढें ओझें परमेश्वरानें इंग्रजांच्या खांद्यावर नाहक लादलें आहे व यांना किती त्रास होत आहे. ज्या दिवशीं हें हलकें होईल त्या दिवशीं खरोखर इंग्रज सुखी होतील.' ओझें हलकें करावयास हे लोकही १९१७पासून तयार आहेत. पण एकदम नव्हे!

## पार्लमेंटची निवडणूक

१९२९ च्या मे महिन्यापासून अॅबर येथें इंग्लंडच्या पार्लमेंटच्या निवडणुकी संबंधीं खळबळ सुरू झाली. प्रत्येक पक्षाची सार्वजनिक व्याख्यानें होऊं लागलीं. लिबरल पक्षाकडून नुकतेंच हिंदुस्तानांतून परत आलेले सर जॉन सायमन यांचें व्याख्यान अॅबरिस्टविथ येथें दि. ८ मे १९२९ रोजीं झालें. प्रत्येक पक्ष आम्हीं

हिंदुस्थानास कशा तऱ्हेनें वागविणार, हिंदी प्रश्न कसा सोडविणार, यावर प्रवचनें करीत सुटे. सर जॉन सायमन यांनीं " हिंदुस्थानचा राजकारभार हिंदी-जनतेच्या हातीं देऊन टाकावयाचें ठरलें आहे व लिबरल पक्षाचें धोरण हेंच राहील " असें घोषित केलें होतें. या नंतर आम्हीं हिंदी विद्यार्थ्यांनीं त्यांची स्वतंत्र भेट घेऊन त्यांना धन्यवाद दिले.

देशांतील निरनिराळया संघांतर्फे व्याख्यानांची झोड संपल्यावर, निवडणुकीचा दिवस जसजसा जवळ येऊं लागला तसतसा लोकांचा उत्साह वाढूं लागला. निवडणुकीची नोंद टॉऊन हॉल, काउंटीस्कूल व इतर सरकारी इमारतींतून होणार होती. मलाही कॉलेजचा विद्यार्थी म्हणून मताधिकार होता. मी मतदानाच्या खोलींत जाईपर्यंत प्रत्येक पार्टीच्या लोकांनीं हस्तपत्रकें दिलीं व मत देण्यास विनवण्या केल्या. आमच्या मालकिणीनें मि. हॉपकिन् मॉरिस ( लिबरल ) यांना मत द्यावयास गळ घातली होती. खुद्द मॉरिस यांनाही हिंदीराजकारणाची कळकळ आहे असें दिसून आलें होतें. म्हणून मी यांनाच मत दिलें. हॉपकिन मॉरिस साहेब पार्लमेंटच्या शिष्टमंडळाबरोबर पुढें ( १९४६ ) मध्यें हिंदुस्थानांत आले. निकालाच्या दिवशीं सर्व शहरांतील रस्ते गजबजून गेले होते. मतांच्या मोजण्या होऊन विजयी लोकांचीं नांवें लंडनहून टेलीफोननें येऊं लागली होती. तास अर्धा तासाच्या अंतरानें ही नांवें मोठमोठ्या इमारतीवरून मॅग्याफोननें पुकारण्यांत येत. आपण मत दिलेली व्यक्ति यशस्वी झाल्याचें ऐकतांच मोठ्यानें ओरड होई व टाळयांचा गजर होऊन आनंद प्रदर्शित केला जाई. मि. रे. मेकडोनाल्डचें नांव येतांच असाच गजर बराच वेळ चालू होता. सर्वांना नांवें ऐकूं यावींत म्हणून ध्वनिक्षेपक यंत्राची व्यवस्था केली होती. लोकांना खाण्यापिण्याच्या वेळेची सुद्धां भ्रांत राहिली नाहीं. कित्येक ठिकाणीं मॅजिक लँटर्नच्या सहाय्यानें नांव पडद्यावर दर्शविलें जाईल. एकंदरींत जनरल इलेक्शनची धामधूम मोठी पाहण्यासारखी असते. या निवडणुकीनंतर मजूर-पक्षाचे मि. रॅ. मॅकडोनाल्ड हे मुख्यप्रधान झाले होते आणि मि. वेजवुडबेन हे हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी नेमले गेले होते.

## एक अपघात

१९२९ जूनच्या २८ तारखेस माझ्यावरचें एक प्राण संकट टळलें. या

दिवशीं पोहावयास मी समुद्रावर गेलों. समुद्र फारच शांत होता. आनंदाच्या भरांत मी सरासरी अर्धा मैल पोहत गेलों असेन. परत फिरतों तों अर्ध्या वाटेंत माझे पाय गारठून गेले. समुद्रकांठ जवळ होता पण ओहोटीमुळें पाणी मला आंत आंत खचूं लागलें. Help, Help म्हणून मी आरोळी ठोकली व पाठीवर कसातरी तरंगत राहिलों. मला Mr. H. T. Holman ( 34, Wolfington Rd- London ) या गृहस्थानें वांचविलें. यानें सुटाबुटांसकट समुद्रांत उडी टाकली व त्यानें मला ओढून काढलें. Pe. 5 Jones यानेंही मदत केली. या दोघांनाही मी कृतज्ञ होऊन चांदीचे फ्लावर पॉट्स नजर केले. पुढें दोन दिवस समुद्राकडे पहावयाची सुद्धां हिंमत होईना. माझ्या अंगावर कांटा उभा राही, म्हणून मी कांहीं दिवसांकरितां लंडनला बंधूकडे निघून गेलों. एकदम निघून येण्याचें कारण बंधूंना कळेना. मी सहज आलों असें तुटक उत्तर दिलें. पण त्याच दिवशीं वर्तमानपत्रांत ' Mr. Nithol Cotkar हिंदुस्तानी विद्यार्थी बुडतां बुडतां वांचला ' अशी अॅबरची बातमी बंधूच्या लॅंडलेडीनें दाखवितांच, भांडें फुटलें !

## लंडन व प्रेक्षणीय स्थळें

या वेळीं मी लंडनला आलों याचें मुख्य कारण म्हणजे माझ्या मनांतील अपघाताची भीति जावी हें होतें. दोन दिवसांतच मला प्रसन्नता वाटूं लागली. वार्षिक परीक्षा संपून मी पास झालों होतों. क्रॉयडनला माझे बंधु वैमानिक-शास्त्राचा अभ्यास करीत असत. मीही क्रॉयडनला राहिलों होतों. मध्य-युरोपांतून क्रॉयडनवर सारखीं विमानें येत असत. या रहदारीची मला गम्मत वाटे. या विमानांतून दहाबारा माणसांची सोय केलेली असते. या लंडनच्या मुक्कामांत मी पक्का भटक्या बनलों ! वाट फुटेल तिकडे दिवसभर लंडनमध्यें फिरावें, थकवा आला म्हणजे कोठेही कार्नर हाऊस मध्यें किंवा A. B. C. रेस्टारंटमध्यें चहा कॉफी घ्यावी, कुठें तरी लंच खावी व रात्रीं ८ ला क्रॉयडनला परत फिरावें. गप्पा मारावयास २१ क्रॉमवेलरोडच्या हिंदी विद्यार्थ्यांच्या वसतिगृहांत, तर कधीं गॉवर स्ट्रीटवरील Y.M.C.A. त जावें. येथें हिंदुस्थानी जेवणही मिळत असे. फार लांब भटकत गेल्यास अंडर ग्राउंडमें

सरळ आपल्या राहण्याच्या ठिकाणीं येतां येत असे. रस्ता चुकल्यास सात फूट उंच असलेल्या पोलिसची मदत घ्यावी. येथील पोलीस फारच चांगल्या रीतीनें वागतात. आसपासच्या भागाचा नकाशाच जणूं त्याच्या डोक्यांत असतो! कुठल्याही भागांस कसें जावें हें दोन मिनिटांत ते समजावून देतात. लंडनचे रस्ते फारच विस्तीर्ण, त्यांतून जाणारा जनसमुदायाचा प्रवाह, पांच, सात मजली टोलेजंग दुतर्फा इमारती, चौकांतून लहान लहान हिरवळीच्या बागा, आणि मधून मधून भव्य पुतळे, एकंदरींत या जगांतील सर्वांत मोठ्या शहराची शोभा फारच अवर्णनीय! ट्राफलगॅार चौकांतील भव्य विजयस्तंभ आणि त्यावरील नेलसनचा पुतळा फारच उठावदार दिसतो. चहा, कॉफी घेत मोठ्या हॉटेलांत बसलों तर एकाद्या राजाच्याही नशिबांत नसेल असें सौख्य लाभल्यासारखें वाटे. हॉटेलांत बसावयाची जागा म्हणजे भला मोठा हॉल, आंत गालिचा अंथरलेला, बाजूस मोठमोठे संगमरवरी खांब, फर्नचीं झाडें लाविलेल्या सुशोभित कुंड्या आणि एका कोपऱ्यांत दहावीस माणसें वाद्यें वाजवून मजुळ स्वरांनीं लोकांचें मनरंजन करीत असलेले; शेंकडों लोकांच्या गर्दींत पांच पंचवीस मेडस् इतक्या चपळाईनें काम करीत, कीं नवीन मनुष्य बसला म्हणजे तिसऱ्या मिनिटांतच त्यानें मागविलेले पदार्थ बिनचूक त्याच्या समोर यावयाचे!

मी एके दिवशीं क्रिस्टल पॅलेस पहावयास गेलों. यावेळीं येथें प्रदर्शनही होतें. हा राजवाडा सर्व कांचांनीं बनविला आहे. क्रिस्टल पॅलेसच्या बाजूच्या मैदानावर मोटर सायकल रेस चालू होती. पॅलेसच्या रस्त्यावरून ख्रिश्चन लोकांची एक मिरवणूक चालली होती. या मिरवणुकींत कांहीं ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं धोतर नेसून, डोक्यास तांबडा फेटा व वहाणा पायांत घातल्या होत्या. ही एक धर्मप्रचाराची चळवळच होती म्हणाना! आकाशांत उंच वर एक विमान उडून तें कसल्याशा धुरांनीं जाहिराती लिहीत होतें. क्रिस्टल पॅलेसमधील प्रदर्शन पाहून मी परत फिरलों.

थेम्स नदीच्या डाव्या बाजूस टॉवर ऑफ लंडन आहे. तें पाहिलें. हें टॉवर ज्यूलियस सीझरनें बांधलें, पुढें White Tower हा भाग विल्यम दि कॉंकरर यानें बांधिला व तिसऱ्या हेन्रीनें याला राजवाड्याचें स्वरूप दिलें. या टॉवरभोंवतीं मोठ मोठे दोन तट उभे आहेत. ११९८ मध्यें हे तट बांधून काढले आहेत. टॉवरच्या तळमजल्यांत जुनीं शस्त्रास्त्रें पाहण्यांत आलीं. यांत कांहीं तोफा

दक्षिण हैद्राबादच्या होत्या. टॉवरच्या वरच्या मजल्यावर राजमुकुट, राजदंड व राणीचे इतर दागिने एका कांचेच्या छोट्या वर्तुळाकार खोलींत ठेविलेले होते. राणीच्या मुकुटावरच्या ' कोहिनूर ' या हैदराबाद येथील गोवळकोंड्याच्या खाणींतील हिऱ्याचें दर्शन झालें. इ. स. १६५० पासून हा हिरा इतिहास-प्रसिद्ध आहे. असें म्हणतात कीं, इंग्रजांनीं पंजाब जिंकल्यावर इ. स. १८४९-५० चे सुमारास हा हिरा विलायतेस नेला व व्हिक्टोरिया राणीला नजर केला. असें सांगतात कीं, राजमुकुट वगैरे ठेविलेल्या कांचेच्या खोलीभोंवतीं वीज वाहत ठेविली आहे. म्हणून कोणासही आंत हात घालतां येत नाहीं अर्थात् याची आम्हीं प्रचीति पाहिली नाहीं ! सेंट जॉन्स चॅपेल नांवाची सुंदर इमारतही टॉवर मध्येंच आहे. पूर्वीं या इमारतींत राजकीय कैदी डांबून ठेवीत असत. कांहीं कैद्यांचा शिरच्छेदही येथें केला होता. या टॉवरच्या बाजूस थेम्स नदीवर एक उचलता पूल आहे. जहाज नदींतून जावयाचें असल्यास पुलाचे दोन भाग अलग होऊन वर उचलले जातात व वाट दिली जाते.

लंडनमध्यें प्रेक्षणीय स्थळें पुष्कळ आहेत. सर्व स्थळांचीं वर्णनें देणें म्हणजे एक गाइड बुकच होईल. तसा माझा हेतु नाहीं. पार्लमेंटच्या इमारती, लॉ कोर्टस्, सेंट जेम्स पॅलेस, मार्बल आर्च, वेस्ट मिन्स्टर ॲबे, पिक्चर गॅलरी, सेंट ( स्टेट ) पॉल कॅथेड्रल, झू गार्डन्स, ब्रिटिश म्यूझियम वगैरे स्थळें मीं पाहिलीं. ब्रिटिश म्यूझियम मध्यें शास्त्रीय दृष्ट्या संग्रहालयाचे भाग केलेले आहेत आणि त्यावर निरनिराळे तज्ज्ञ अधिकारी नेमले आहेत. छापील पुस्तकें, जुन्या पोथ्या, पौर्वात्य हस्तलिखितांचीं बंडलें, ग्रीक व रोमन कालांतील ऐतिहासिक पुस्तकें, पुरातन कालीन नाणीं वगैरे पाहण्यांत आलीं. हें जगांतील एक श्रेष्ठ संग्रहालय आहे.

लंडन झू गार्डन्स मध्येंही नाना तऱ्हेचे प्राणी, अत्यंत लहान खारीपासून तों अजस्र हिपोपोटॅमसपर्यंत शास्त्रीय दृष्ट्या विभाग करून ठेवलेले दिसून येतात. एका दिवसांत हे प्राणी पाहून सुद्धां होत नाहींत. सिंह आणि वाघिणीपासून झालेला मिश्र प्राणी पाहिला. याला आयाळ असून शरिरावर वाघासारखे पट्टे होते. पतियाळाच्या महाराजांनीं हा प्राणी भेट म्हणून ' झू गार्डन्स ' ला दिला आहे. याच बागेंत ओरँगउटँग वानरेंही पाहिलीं. आम्ही जातांच या उंच, माणसासारख्या वानरांनीं सलाम ठोकला

व सिगारेटकरितां हात पुढें केला. पण बाहेर नोटीस होती. Please do not offer Cigarettes. लंडन झू मध्येंच एम्पोरियमही आहे. येथें हजारों जातींचे मासे कांचेच्या हौदांतून ठेविले आहेत. कांहीं तर संक्रांतीच्या तिळगुळा येवढे बारीक आणि रंगी बेरंगी आहेत. कांचेच्या हौदांत जेवढी उष्णता यांना जिवंत ठेवण्यास लागते तेवढी विजेनें व वाफेनें ठेवून त्या त्या जातीच्या माशांना अनुकूल वातावरण निर्माण केलें आहे. येथून आम्ही परत फिरलों.

या नंतर एके दिवशीं मॅडम टयूसाडचें मेणाच्या चित्राचें प्रदर्शन पाहिलें. हें प्रदर्शन एका भव्य इमारतींत ठेविलें आहे. माझ्याबरोबर एक दोन इंग्रज मित्रही होते. या प्रदर्शनांत मेणाचीं चित्रें इतकीं हुबेहूब आहेत कीं, दारांत सॅल्यूट करून उभा असलेल्या शिपायाच्या चित्रास, खरा शिपाई समजून पटदिशीं इतर प्रेक्षक सॅल्युट करतात ! आंत, इंग्लंडचे पूर्वींचे नामांकित प्राइम मिनिस्टर्स, कवि, लेखक यांचे पुतळे पाहण्यांत आले. हे इतके चांगले साधले आहेत कीं, आपण खऱ्याखुऱ्या जिवंत माणसासमोर उभे आहोत कीं काय असा भास होतो.

मॅडम टयूसाड ही फ्रेंच बाई, एके काळीं फ्रान्स मध्यें असे पुतळे तयार करीत असे. तिला फ्रेंच लोकांनीं हडळ ठरवून फ्रान्समधून हांकून लाविलें, पुढें ती लंडन येथें येऊन पुतळे करूं लागली. तिच्याच नांवानें हें प्रदर्शन प्रसिद्ध आहे. तिचेंही अंतकालचें एक चित्र ठेविलें आहे. नेपोलियन बादशहाचें अंत्यदर्शन पाहण्यालायक आहे. हें पहात असतांना गांभीर्याचें वातावरण भोंवतीं पसरतें. प्रदर्शनांत एका ठिकाणीं महात्मा गांधीही चरखा चालवीत बसलेले दिसून येतात.

याच इमारतीच्या गाभाऱ्यांत दुष्ट व क्रूर लोकांचे पुतळे ठेविले आहेत. इंग्लडच्या प्रख्यात डाकू, चोर आणि खुनी लोकांच्या संगतींत एक क्षण आपण आहोत असें वाटून येथील भयंकर वातावरणाचा परिणाम मनावर झाल्याशिवाय रहात नाहीं. नानातऱ्हेचीं जुनीं कत्तल करावयाचीं आयुधें या ठिकाणीं ठेवलीं आहेत. Guillotine नांवाचें कत्तल करावयाचें यंत्र पाहून अंगावर शहारेच आले. आतां सुधारलेल्या राष्ट्रांत म्हणे, फांशीची शिक्षा झालेल्या माणसास विजेच्या खुर्चीवर बसवून त्याला नकळत त्याचा शेवट करण्यांत येतो!

## नाटकगृहें व सिनेमागृहें

लंडनची भव्य आणि विशाल नाटकगृहें पाहून आश्चर्य वाटल्यावांचून राहात नाहीं. यांत ४-५ हजार लोक व्यवस्थितपणें बसूं शकतील अशी व्यवस्था केलेली असते. तिकिटाच्या खिडकीजवळ कधींच गर्दी होत नाहीं. कारण 'क्यू' करून लोक उभे असतात.

बोलपट दुपारीं ३ पासून रात्रीं १२ पर्यंत चालू असतात. पहिला खेळ पहावयास गेलेल्या गृहस्थास तो दुसरा खेळ जरी पहात बसला तरी कोणी उठवीत नाहीं. पण लोकांना कामाची गडबड असल्यामुळें असें कोणीच करीत नाहीं. चित्रपट चालू असतांना केव्हांही प्रवेश मिळवावयाचा व आपण पाहिलेल्या भागापर्यंत चित्रपट आला कीं उठून जावयाचें असें चालतें. सिनेमागृह आणि नाटकगृह बहुतेक ३-४ मजली असतें. प्रत्येक मजल्यावर मागच्या बाजूस विश्रांतिगृह असतें. बोलपट पहात असतां मध्यंतरीं चहा वगैरे घ्यावयाचा असेल तर, सीट वरून उठून २०-२५ पावलें मागें गेलें तर आपण भव्य अशा हॉटेलमध्यें असल्याचें दिसून येतें. चहा किंवा लेमनेड घेतल्यावर पुन्हां जाऊन आपल्या पहिल्या जागेवर बसावें किंवा बाहेर जावें. लंडनचे रस्ते रात्रीं दोन वाजेपर्यंत गजबजलेले असतात. श्रीमंत व चैनी लोकांच्या जीवनास येथें रात्रीं १२ नंतर दिवस उजाडतो! रात्रीं लंडनमध्यें भटकणाऱ्या तरुण विद्यार्थ्यानें मात्र रस्त्यांतून सरळ व जपूनच चालावें. नाहींतर पाय घसरावयाचा! वांकडें पाऊल पडावें म्हणून प्रयत्न करणाऱ्या तरुण स्त्रियांचे तांडे रस्त्यांतून फिरत असतात, किंवा बंद झालेल्या दुकानांच्या पायऱ्याजवळ एखादी 'रंभा' उभी राहून तोंडाला पावडरची पुटें देत अथवा ओंठाला लिप्स्टिक लावीत अथवा आपला चिमुकला आरसा आपल्या हँडबॅगमधून काढून स्वतःचें सौंदर्य ठाकठीक करीत असलेली दिसून येईल! हिचें काम म्हणजे तरुणांना चिमुकलें हास्य देऊन, रुकार मिळाल्यास त्यांच्या पैशांचा धुव्वा उडवून नाटकास जावयाचें, प्यावयाचें, नाचावयास जावयाचें. एकूण चैन करावयाची एवढेंच! असो.

अंडर-ग्राऊंड ट्रेनची मला फारच मौज वाटावयाची. भल्यामोठ्या लिफ्टमधून जमिनीखालीं १०० फूट किंवा त्याहून जास्त अंतरावर उतरावयाचें कांहीं ठिकाणीं तर आपोआप खालींवर जाणाऱ्या पायऱ्या आहेत. त्यांवर दोन तीन

मिनिटें उभें राहिलें कीं माणसें खालीं जात तर दुसऱ्या बाजूनें खालचीं माणसें वर येत. जमिनीखालीं मोठमोठीं स्टेशनें आहेत. ( मुंबईचें व्हिक्टोरिया स्टेशन जमिनीच्या आंत असल्याची कल्पना केल्यास या स्टेशनची थोडी कल्पना वाचकांस येईल. ) कांहीं ठिकाणीं अशा स्टेशनमध्यें थोडी फार छोटीं मोठीं दुकानेंही पहाण्यांत आलीं. तिकिटें विकत घ्यावयाचे स्टँडस उभे असतात. यावर निरनिराळया स्टेशनचीं नांवें व दर लिहिलेले असतात. यंत्रांत तेवढे पैसे टाकले कीं पटदिशीं तिकिट आपल्या हातांत येतें. दोन तीन दिशेस गाड्या चालतात. जिकडे तिकडे सूचक पाट्या लिहिलेल्या असतात. आपणांस जिकडे जावयाचें त्या प्लॅटफार्मवर उभें रहावयाचें. दर तीन चार मिनिटांनीं ट्रेन येते. दारें आपोआप उघडलीं व झांकलीं जातात. परंतु आंत शिरावयास जर ठराविक वेळेपेक्षां दोन सेकंदही जरी उशीर झाला तर मात्र त्या दारांत बोटें किंवा शरिराचा एकादा भाग चेंगरण्याचीच पाळी !

रस्त्यांतून भीक मागावयास कायद्यानें मनाई आहे. त्यामुळें फूटपाथवर एखादा भिकारी रंगीत खडूंनीं चित्रें काढून आपली टोपी उपडी ठेवतो. चित्रें दाखवून पैसे कमावण्याचा ( भीक मागण्याचा ) हा एक प्रकार आहे. एखादे वेळीं भिकारी दहा पावलें आपल्या बरोबर येऊन हळूच आपली हकीकत सांगतो व ' मदत केल्यास मी फार आभारी होईन. ' म्हणतो; पण पोलिसला पहातांच हा लगेच दुरून चालूं लागतो. येथें पैशांत लोळणारे श्रीमंत लोक जितके आढळून येतात त्याच्या कितीतरी पट दरिद्री लोकहि नजरेस पडतात. अशा लोकांना झोंपावयास जागा सुद्धां भाड्यानें घ्यावी लागते. एखादे वेळीं जागा न मिळाली तर बागेंत अथवा रस्त्यांत कोठें तरी झोपल्यामुळें थंडीनें गारठून मृत झाल्याचींहि उदाहरणें ऐकण्यांत येतात ! गरिबागुरिबांकरितां अगदीं स्वस्त दराच्याही झोंपावयाच्या जागा आहेत. दोघे दोघे किंवा तिघे तिघे मिळून एक पलंग भाड्यानें घेतात व झोंपतात ! कांहीं खबदाडें अशीं आहेत कीं एका माणसा-सही रहावयास अपुऱ्या असणाऱ्या खोलींत सात सात जण सुद्धां राहातात. अशा ठिकाणांना Slums म्हणतात. हे लोक तुटकें किंवा एखादें ओढून टाकलेलें सिगारेटचें थोटुक मिळालें तर तेवढ्यावर सुद्धां समाधान मानतात. हे लोक काड्यांच्या पेट्या अगर बुटाच्या लेसेस हातांत धरून विकीत फिरतात. यांच्या जवळून कोणी जर एखादी वस्तु घेतली तर त्याच्या किंमतीच्या दुप्पट पैसे

त्याच्या हातांत टाकतात. गरीब आणि श्रीमंत या दोघांनाही खूष ठेवणें हा पाश्चात्य राष्ट्रांत राजकारणाचा एक मोठा डाव होऊन बसला आहे. इंग्लंडमध्यें श्रीमंत लोकांवर खूपसे कर आहेत. त्यांच्या चैनीच्या वस्तूंवरही कर असल्यामुळें त्यांच्याकडून बराच पैसा ओढिला जातो. मृत्यूनंतरही श्रीमंत लोकांच्या इस्टेटीचा कांहीं भाग सरकार घेतेंच.

गरिबांची सोय जर न केली तर हे लोक मोठें आंदोलन केल्याशिवाय राहात नाहींत. म्हणून यांना 'डोल' (खाण्यापिण्याची मदत) देण्यांत येते. पुअर-लॉचा प्रचार असल्यामुळें या कायद्यानेंही गरिबांना मदत दिली जाते. Unemployment Bureau आहेत यांत बेकार लोकांकरतां फंड जमा केलेला असतो. बेकारांनीं यावें, मेंबर व्हावें. यांना काम मिळवून देणें हें या संस्थेचें काम असनें. कामावर असतांना मजुरीचा कांहीं ठराविक हिस्सा या फंडांत जमा होतो व काम नसेल तेव्हां यांतून मदत केली जाते. काम मिळालें म्हणजे बेकारांनीं कामावर गेलेंच पाहिजे. नाहींतर वरील संस्थेंतून नांव काढिलें जातें. असें म्हणतात कीं डॉक्टरचें खोटें सर्टिफिकेट पाठवून कामावर न जातां घरीं बसून बेकारीची मदत खाणारा एखादा चुकारतट्टूही नजरेस पडतो !

म्हातारपणामुळें काम होत नसेल तर अशांच्या साठीं, 'Old age pension' ची व्यवस्था आहे. याशिवाय विधवांना 'Widows pension' ही मिळतें. एकंदरींत येथील सरकारकडून म्हाताऱ्यांना, विधवांना, बेकारांना व गरिबांना केवढी मदत केली जाते हें यावरून दिसून येईल. आपल्याकडे त्यांचा आधार म्हणजे परमेश्वरच !

## हाइडपार्क

मार्बल-आर्च मधून एक रस्ता ओलांडून गेलों म्हणजे आपण हाइडपार्क गार्डन्समध्यें जातों. येथें बाग कांहीं मोठीशी नाहीं पण हिरवळीचीं सुंदर मैदानें असून मधूनमधून चांगल्या वाटा तयार केलेल्या आहेत. रविवारची संध्याकाळ म्हणजे अत्यंत आनंदाची वेळ ! सर्व कामकरी वर्गांना दर शनिवारीं आठ-वड्याचा पगार मिळतो. पुष्कळ लोक या पैशांतील मोठा भाग पिण्यांत आणि चैन करण्यांत खर्च करून टाकतात. सुंदर कपडे घालून स्त्री-पुरुषांच्या झुंडीच्या झुंडी फुलपांखरांप्रमाणें इतस्ततः विहरत असलेल्या दिसून येतात. या ठिकाणीं

हातांत हात घालून हंसत खिदळत असलेले हे लोक पाहिले म्हणजे यांच्या प्रेमसागराला जणूं भरतीच आली आहे कीं काय असें वाटूं लागतें !

असें म्हणतात कीं, या ठिकाणीं वाटेल त्या पार्लमेंटरी पुढाऱ्याची वाटेल तशी टीका करून वाटतील तेवढे शालजोडींतील * * मारण्याची पुरातन कालापासून कायद्यानें परवानगी दिली आहे ! आणि म्हणूनच रविवारीं हाइड-पार्कमध्यें फुटकळ वक्त्यांच्या व्याख्यानांची गर्दी चाललेली असते दर ५०-५० पावलांवर प्लॅटफॉर्म उभा करून कोणी तरी वक्ता मोठमोठ्या लोकांवर घसा फोडफोडून तोंडसुख घेत असलेला दिसून येतो. व्याख्यानांत फारसा अर्थ नसतो पण ऐकत रहावयास मात्र मौज वाटते. एका प्लॅटफार्मवर हिंदुस्थान-संबंधींही जोरदार भाषण चालू होतें. वक्ता जीव तोडून तोडून बोलत होता. लोकही मधून मधून प्रश्न विचारून त्याला उल्हसित करीत होते. आम्ही मनांत म्हटलें, का बाबा, उगीच शिरा ताणतोस, अशानें थोडाच हिंदुस्थानचा प्रश्न सुटणार आहे ?

हाइडपार्क मधून थोडें पुढें गेलें असतां 'सर्पेंटाइन लेक' ( नाग तलाव ) लागतो किनाऱ्यांवर भाड्यानें नावा मिळतात. गुलहौशी लोक या नावा भाड्यानें घेऊन दीडदोन तास वल्हवीत फिरतात. अशा तऱ्हेनें हाइडपार्क पाहून मी निवासस्थानीं परतलों.

लंडनचे बॅरिस्टर व्हिक्टर एव्हन नांवाचे गृहस्थ आमच्या युनिव्हर्सिटींत पार्ट-टाइम प्रोफेसर होते. यांना नं. ४ पेपर बिल्डिंगज्मध्यें मी भेटावयास गेलों. इकडील प्रोफेसर्सही फारच थट्टेखोर असतात असें वाटतें. लंच वगैरे झाल्यावर त्यांनीं मला लंडन हायकोर्ट दाखवावयास नेलें. तेथें लॉर्ड रीडिंग चीफ जस्टिस यांचा इजलास दाखवीत असतांना मला हळूंच उचलून लॉर्ड रीडिंग यांच्या खुर्चीवर बसविलें व ते म्हणाले कीं, "कांहीं सांगतां येत नाहीं, कदाचित् तूंही हिंदुस्थानांत चीफ जस्टिस होशील ! " अर्थात् कोर्ट बंद होतें ! मला प्रोफेसरसाहेबांचें हंसूं आलें व मी Thanks एवढेंच म्हटलें.

मी लंडनला जेथें उतरत असे त्या लँडलेडीचा पति महायुद्धांत मृत्युमुखीं पडला होता. हिच्या घरीं मँटल पीसवर जर्मनशिपायाचें एक तुटकें मोडकें हेल्मेट ( शिरस्त्राण ) ठेवलें होतें. तें दाखवीत ती म्हणे, " जर्मन शिपाई अतिशय निर्दय व क्रूर ! त्यांच्या क्रूरपणाला अंतच नाहीं. " असें म्हणून

तिनें एका लहान सळईच्या खालच्या बाजूस असलेले भोंवरे दाखविले. भोंवऱ्यांच्या खालीं अणकुचीदार तीक्ष्ण खिळे होते. ती म्हणाली, " हे पहा, शाळा सुटावयाच्या वेळीं विमानांतून पोतींच्या पोतीं असलें भोंवरें जर्मनलोक लहान मुलांवर टाकीत. यामुळें कित्येक मुलांचीं डोकीं फुटून त्यांचा अंत झाला व कित्येक जखमी झालीं. " बाईच्या बोलण्यावरून सहज दिसून आलें कीं अजून जर्मन लोकांसंबंधीं इंग्रज लोकांत तेढ आहे ! असें म्हणतात कीं, तरुण तरुणींचें बेफाम वर्तन, पिण्याच्या व्यसनाचा अतिरेक वगैरे अवगुण महायुद्धानंतरच येथें फार पसरले आहेत.

थोड्या दिवसानंतर लंडनसंबंधीं अनुकूल प्रतिकूल मतें बनवीत वेल्सला ॲबर येथें परत फिरलों.

## लढाऊ जहाज

उन्हाळ्याची सुटी अजून संपली नव्हती. ॲबरला हवा उन्हाळ्यांत फारच चांगली असते म्हणून इंग्लंडांतील पुष्कळ लोक येथें महिना दीड महिना येऊन राहातात. अशा वेळीं लोकांना दाखविण्याकरितां सरकारचें एक लढाऊ जहाज दूरवर समुद्रांत ठेवलें होतें. तिकिट काढून आम्ही जहाज पहावयास गेलों. या जहाजावर उभें राहिल्यानंतर आमचा हिंदुस्थान देश आरमाराच्या बाबतींत कितो लुळा पांगळा आहे याची प्रत्यक्ष कल्पना आली. जहाजाच्या सर्व बाजूंनीं भल्या मोठ्या लांब पल्ल्याच्या तोफा रोखून ठेविलेल्या होत्या. तसेंच कोपऱ्यांवर दुर्बिणी उभ्या करून ठेविल्या होत्या. चार सर्चलाइटचे दिवे होते. सर्वांत आश्चर्यकारक गोष्ट म्हणजे बोटीच्या तळमजल्यांत १० विमानें ठेवलेलीं होतीं. बटन दाबतांच एक एक विमान तळमजल्यांतून डेकवर येई व तेथेंच वर आकाशांत उडविण्याची व्यवस्था होती. सर्वांत वरच्या मजल्यावर वायरलेसची व्यवस्था होती. तसेंच आकाशांत जर एखादें शत्रूचें विमान उडत असलें तर त्याचा सूक्ष्म ध्वनि व दिशा दाखविणारें यंत्र ठेविलेलें होतें. आम्ही या लढाऊ जहाजाच्या तळमजल्यांतही गेलों होतों. या ठिकाणीं पाण्यांतून शत्रूच्या सबमरीनला टॉर्पेडो सोडून फोडण्याचें तोफेसारखें यंत्र होतें. लढाऊ जहाज पाहून आम्हीं परत फिरलों. रात्रीं आठाला जहाजावरून सर्चलाइटचा प्रकाश गांवावर पाडला. सर्व समुद्रकिनारा दिवसासारखा स्पष्ट दिसत

होता. एवढेंच नव्हे तर एक दीड मैलावरून पाडलेल्या प्रकाशांत वर्तमानपत्रही स्पष्ट वाचतां येत होतें. आकाशांत दूरवर प्रकाशाचे पट्टे एकमेकांना छाटून जात; तसेच ते समुद्राच्या पाण्यांतही जेव्हां घुसत तेव्हां मासेसुद्धां स्पष्ट दिसत. या जहाजांतील बारीक सारीक महत्त्वाच्या जागा दाखवीत नाहींत. त्याचप्रमाणें जवळून फोटो घेण्याचीही मनाई होती.

## वेल्सचा पश्चिम किनारा

वेल्सचा पश्चिम किनारा फारच सुंदर आहे. कांहीं छोटीं मोठीं बंदरें आहेत. अशा ठिकाणीं मैलच्या मैल समुद्र किनारा बांधून काढला आहे. माझे वर्ग-बंधु मि. रॉडरिक बेविन ( आतां १९४५ मध्यें पार्लमेंटचे मेंबर झालेले ) यांच्या बरोबर मोटारींतून पश्चिम किनाऱ्यावर जवळ जवळ ३०० मैल प्रवास करण्याची संधि आली होती. ऑगस्टच्या ३१ ता. ला आम्ही निघालों. खरें पाहूं गेल्यास वेल्स डोंगराळ प्रांत आहे. डोंगरावरील हिरवीगार कुरणें फारच मनोरम वाटतात. या कुरणांवर मेंढ्यांचे कळपचे कळप चरत असलेले दिसतात. येथील मुख्य धंदा लोंकरीचा आहे. वेल्स लोंकर जगप्रसिद्ध आहे. दक्षिण वेल्समध्ये र्‍होंडा व्हॅलीमध्यें कोळशाच्या उत्कृष्ट खाणी आहेत. उत्तर वेल्स मध्यें खेडीं विरळ तर दक्षिणेंत शहरें वसलेलीं असून लोकसंख्याही जास्त आहे. कार्डिफ, स्वानसी, न्यू पोर्ट हीं नांवाजलेलीं बंदरें आहेत. कार्डिफ बंदरांतून वेल्श कोळसा जगांतील अनेक देशास पोंचविला जातो. पुढें दुसऱ्या वर्षी १९३२ मध्यें Llangranog ( ल्लान ग्रॅनोज ) Tenby North Beach आणि Goscar Rocks पाहिलें. १९३१ च्या सप्टेंबर महिन्यांत मी ब्लॅकपूल येथील रोषणाई पाहण्यास गेलों होतों.

वेलसमध्यें ब्लॅकपूल हें ठिकाण पाहण्यासारखें आहे. येथील ५-७ मैलांचा समुद्रकांठ तीन पायऱ्यांनीं घाटवजा बांधून काढला आहे. प्रत्येक पायरी म्हणजे मोठीं सडकच ! संध्याकाळीं यावरून मोटारी जा ये करितात समुद्रकांठावर ठिकठिकाणीं स्नानाकरितां बाथ्स आहेत, आणि समुद्रकांठावरच्या पलीकडील रस्त्यावर भलें मोठें नृत्यालय आहे. शहराच्या मधोमध एक लोखंडी फारच उंच असें टॉवर आहे. हें टॉवर फ्रान्समधील इफेल टॉवरच्या धर्तीवर बांधलेलें आहे. लिफ्टमधून यावर जावें लागतें. येथून रात्रीच्या वेळीं

ब्लॅकपूलची शोभा फारच अवर्णनीय दिसते ! उन्हाळ्यांत दरवर्षी २० दिवस येथें आरास करण्यात येते. सर्व ट्रॅमूसना हिरवे, निळे, पिवळे इ. रंगांचे विजेचे दिवे लावलेले असतात. शहरांतून जागोजागीं रंगीत दिव्यांच्या मोठमोठ्या कमानी उभारून त्यांतून मध्यभागीं कृत्रिम फळाफुलांच्या मोठमोठया परड्या लटकत असतात ! लोक हौशीनें आपल्या वाहनांसही रंगीत दिवे लावतात. बागेतून रंगीत प्रकाशाचे जोरदार किरण झाडांवरून सोडतात. अशा तऱ्हेनें झाडांचीं पानेंसुद्धां रंगीबेरंगी दिसतात. कोठें सुशोभित हौदांचें पाणी केशरी दिसतें तर कोठें नाना रंगांचे फवारे या हौदांवर उडत असलेले दिसतात. बाथमधून पाण्यांच्या तळांतून असेच रंगीत दिवे ठेवलेले असल्यामुळें नाना-रंगांचें पाणी मोठें सुंदर दिसतें एकाच नमुन्याच्या फुलपांखराचे वीस पंचवीस साचे एकापुढें एक ठेवून प्रत्येक सांच्याचे दिवे चटचट लावले आणि विझविले असतां मोठें रंगीत फुलपांखरूं उडत असल्याचा भास होतो. अशा तऱ्हेचीं निरनिराळीं चित्रें ठेवलीं होतीं. सर्वांत मजा अशी कीं, वर विमानें उडत असून त्यांतूनही रंगीत सर्च-लाइटस् सर्व शहरावर पाडले जात. ही शोभा टॉवरवर उभें राहून एकसमयावच्छेदेंकरून पाहिली असतां क्षणभर स्वर्गीय-सौंदर्य-दर्शनाचा लाभ झाल्याप्रमाणें वाटतें.

ब्लॅक-पूल पाहून आम्ही परत अंबर येथें येऊन पोहोंचलों. अजून सुटीचे दिवस संपले नव्हते. एक दोन वर्षांपासून माझी आणि मि. पार्डी यांची फारच गट्टी जमत चालली होती. हे गृहस्थ Doctor of Divinity चा अभ्यास करीत होते. फावल्या वेळीं हिंदुधर्माची माहिती गोळा करण्यास ते माझ्याकडे मधून मधून येऊन बसत असत. मि. पार्डी यांचा स्वभाव फार मनमिळाऊ असल्यामुळें यांच्याशीं गप्पा करण्यांत वेळ मजेंत जाई. धार्मिक अभ्यास केल्यावर आपली नेमणूक हिंदुस्थानांत करवून घेण्याचा त्यांचा विचार होता. म्हणून माझ्याकडून त्यांनीं हिंदी शिकून घेण्याचें ठरविलें. मि पार्डी यांना हिंदी धुळाक्षरें लौकर येईनात. पण इंग्रजींतून हिंदी शब्द लिहून यांना शिकविणें सोपें जाईल असें वाटून तसें सुरू केलें. एक दोन महिन्यांतच ' आप कैसे है, आपका नाम क्या है, अशीं लहान लहान वाक्यें बोलण्यापर्यंत त्यांची प्रगति झालेली पाहून मलाही आनंद होऊं लागला. भेटीनंतर प्रथम चार सहा वाक्यें हिंदींतूनच बोलण्याचा आम्ही परिपाठ ठेवला होता. हे गृहस्थ मधून मधून

मला अॅबरच्या पार्सनकडे घेऊन जात. पार्सन २४ तास ख्रिस्ती धर्माची महति माझ्यापुढें गात असत व शेवटीं ठराविक वाक्य उच्चारीत कीं, 'ख्रिस्तो झाल्या-शिवाय स्वर्ग मिळत नाहीं.' मी ख्रिस्ती धर्माची दीक्षा घ्यावी म्हणूनही कदा-चित् त्याचा प्रयत्न असावा. मीही त्या वाक्याचें उत्तर एकच देत असें कीं, 'तुमचा परमेश्वर मोठाच चमत्कारिक दिसतो. यानें स्वर्गाच्या दाराला भलें मोठें कुलूप लावून दारावर एका ख्रिस्त्यालाच बसविलें आहे असें दिसतें, व ज्याच्या हातांत ख्रिस्ताचें तिकिट असेल त्यासच स्वर्गांत प्रवेश मिळत असावा. बुद्धधर्मी, मुसलमानधर्मी, हिंदु व तसेंच इतर धर्मी लोक या दारांतून जाऊं शकत नाहींत यावरून तुम्ही जो परमेश्वर मानला आहे तो फारच पक्षपाती दिसतो." यावर त्यांचेकडून कांहींच उत्तर येत नसे. धार्मिक लोकांत थोडेसें वावरल्याबरोबर १९२९ च्या तिसऱ्या आठवड्यांत इंग्लंडांतील ख्रिस्ती धर्म परिषद अॅबर येथें भरली होती त्याचें आमंत्रण येऊन थडकलें! मी परिषदेस नियमानें जाऊन बसूं लागलों. इतकेंच नव्हे तर १'५ मिनिटें बोलण्याचाही योग आला. १५ मिनिटांत हिंदुधर्मावर काय बोलणार? पण मी असें पाहिलें कीं, माझ्या ज्ञानाच्या मानानें १५ मिनिटें सुद्धां मला बोलतां येईल कीं नाहीं शंकाच. कसा बसा १५ मिनिटें मी बोललों. "हिंदुधर्मातील आश्रम-व्यवस्था आणि स्त्रियांचा दर्जा' येवढ्या दोन मुद्यांवर माझें भाषण होतें. आम्ही 'स्त्रियांना जनावरांप्रमाणें वागवितों अशी कांहींच लोकांची मतें होतीं. त्यांना माझीं १०।५ वाक्यें ऐकून पराकाष्ठेचा विस्मय वाटला. परिषद संपल्यावर माझ्यावर हजारों प्रश्नांचा भडिमार होऊं लागला. मी मनांत म्हटलें आपण स्वामी विवेकानंदांचा आविर्भाव आणला हें कांहीं बरें केलें नाहीं. आतां निस्तारणें कठिण! मग कांहींना प्रश्नांचीं उत्तरें देऊन व 'रचा प्रभू' हें पद खड्या सुरांत म्हणून दाखवून व त्याचा अर्थ सांगून तेथून पळ काढला. जातां जातां सर्वांनीं मोठ्या प्रेमानें बायबलची एक सचित्र प्रत माझ्या हातांत दिली. कांहींनीं माझा Adutograph घेतला. मला महापुरुष झाल्यासारखें वाटत होतें! एवढें मात्र खरें कीं, मला अजूनही वाटतें कीं चांगलें धार्मिक ज्ञान करवून घेऊन आपल्या धर्माची माहिती देण्यासाठीं पुन्हां एकदां विलायतेस जावें.

प्रत्येक धर्मांत निरनिराळ्या चालीरीति असतात. त्यांना आपण कधींहि हंसूं नये. एक गोष्ट मला आठवते. मी ज्या घरांत रहात होतों. तेथील

मालकाचें देहावसान झालें. हिंवाळयाचे दिवस होते. घरांतील लोकांनीं जवळ जवळ ८–१० दिवस प्रेत घरींच ठेवलें. रोज कांहीं लोक येऊन दर्शन घेऊन जात. पण आपल्याकडील लोकांप्रमाणें कोणी मोठयानें रडत नाहींत अथवा छाती बडवून घेत नाहींत याचें मला नवल वाटलें. नुसता हातरुमाल काढून धुसपुसत होते. अर्थात् दुःख तर होणारच पण त्याचा देखावा करीत नाहींत. घराच्या खिडक्यांवर काळे पडदे टाकलेले असत, परंतु घरांत रोजचे व्यवहार व्यवस्थित चालू होते. आपल्याकडील सुतकाच्या पद्धतीसारखी इकडे पद्धत नाहीं. अखेरच्या दिवशीं मात्र तेथील पाद्री येऊन मृताचें, त्याच्या वडिलाचें आजाचें वगैरे नांवें व रहाण्याच्या ठिकाणचें नांव वगैरे म्हणून, मृतात्म्याच्या शांतीसाठीं कांहीं मंत्र उच्चारून मृताच्या पेटीस शेवटचे खिळे ठोकावयास आरंभ केला. यावेळीं मात्र मृतांचे आप्तेष्ट मोठमोठ्यानें हुंदके देऊं लागले. मृतास, उत्कृष्ट तऱ्हेचा काळा सूट घातला होता. स्मशानयात्रेच्या वेळीं पेटी गाडीवर ठेवण्यांत आली. वाटेंत ओळखीचे लोक भेटले म्हणजे पुष्प-वर्तुळें Wreaths या पेटीवर ठेवीत. स्मशानांत प्रेतास पुरावयाची जागा भाड्यानें घ्यावी लागते व त्यावर वार्षिक करही द्यावा लागतो. याचें मात्र आश्चर्य वाटलें. असो.

## इंग्लंडमधील शेवटचे दिवस

माझी LL. B. ची परीक्षा २ एप्रिल १९२८ ला संपली होती. अजून निकाल लागला नव्हता. तीन महिन्यांची सुटी होती. मला आतां एकच काळजी राहिली होती. ती म्हणजे बॅरिस्टरीचा कोर्स संपविणें. बॅरिस्टरीच्या टर्म भरावयास न चुकतां मी लंडनला जात असें. जून महिन्याची टर्म भरावयास मी लंडनला गेलों. टर्म भरणें म्हणजे ( Dinner ) खाना खाणें ! LL. B. चा व बॅरिस्टरीचा अभ्यास एकच असल्यामुळें युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांस अशा रीतीनें टर्मस् भरून परीक्षेस बसतां येतें. लंडनला गेलों म्हणजे एखादें चांगलें नाटक अथवा सिनेमा पहावयाचा हा माझा कार्यक्रम ठरलेला होता. सिनेमा पाहून परत फिरणार, पण रात्रीच्या गाडीला अजून दोन तास अवकाश होता. एका मित्रानें सुचविलें कीं, स्टेशनजवळ न्यूजरील दाखवितात. तेथें बसावें व ट्रेनची वेळ झाली म्हणजे तेथून उठून ट्रेन गांठावी

तें एक मूकचित्रपटाचें अति लहान असें थिएटर होतें. तेथें जाऊन बसलों व नंतर रात्रीची ट्रेन गांठली. माझ्याबरोबर अर्ध्या वाटेपर्यंत एक वेल्श मित्र होता. त्यामुळें आगगाडींतील रात्रीचा वेळ गप्पासप्पांत निघून गेला व सकाळीं अॅबरला पोहोंचलों. सकाळीं घरीं जाऊन टपाल हातीं घेऊन फोडलें तों पुण्याहून कधीं न येणारा ' ज्ञानप्रकाशचा ' अंक जून १९३२ च्या तिसऱ्या आठवड्यांत माझ्या हातीं आला. वाचून पाहातों तों त्यांत माझ्या वडिलांच्या प्रेतयात्रेची बातमी ! आणि डॉ. परांजपे यांचें स्मशानभूमीवर भाषण !! माझ्या अंगावर कांटा उभा राहिला. डोळ्यांसमोर काजवे चमकूं लागले. मला कांहीं सुचेना. रडूं लागलों ! परदेशांत दुसरें काय करणार ? माझ्या मालकिणीनें पुष्कळ समजाविलें. तसाच उठून पत्र वगैरे आहे किंवा काय हें पहावयास कॉलेजांत गेलों. माझें चित्त ठिकाणावर नव्हतें. कॉलेज बोर्डवर एक तार व एक माझ्या वडील बंधूंचें पत्र होतें. ' तारेनें पैसे पाठविले आहेत. ताबडतोब हिंदुस्थानास परत यावें ' एवढाच मजकूर होता.

मनुष्याचें जीवन पूर्ण सुखाचें कधींच असूं शकत नाहीं असें वाटतें. जगांत जर दुःख नसतेंच तर सुखाची किंमतच राहिली नसती, म्हणूनच परमेश्वर मधून मधून दुःखाच्या डागण्या देतो कीं काय कोण जाणे ? इंग्लंडमध्यें मला सौख्यमंदिराच्या शिखरावर असल्यासारखें वाटत होतें. तो आनंद एकदम रसातळाला गेल्यासारखें वाटलें. माझा आधारच तुटला ? त्याबरोबरच विलायतची यात्राही संपुष्टांत आली. शिक्षणही आटोपलें. विलायतेस जावयाचें जसें एकाएकीं ठरलें तसेंच तेथून निघावयाचेंही एकदमच ठरवावें लागलें. जुलैच्या पहिल्या आठवड्यांतच इटालियन लाइट ट्रिस्टिनो कंपनीस तारेनें जागा राखून ठेवावयास कळविलें होतें. ' व्हिक्टोरिया ' बोटींत जागा मिळाली. अॅबरहून मला पाठविण्यास डॉ. शिरनामे माझ्याबरोबर लंडनपर्यंत मुद्दाम आले. त्यांनीं मला बराच धीर दिला. अगदीं निघावयाच्या दिवशीं प्रो. व्हिक्टर एव्हन्स यांनींही येऊन बराच धीर दिला.

## परत हिंदुस्थान

हिंदुस्थान सोडून जातांनाचें संपूर्ण वर्णन मीं केलें आहे. हिंदुस्थानांत परत तांना एकतर कांहीं विशेष घडलेंही नाहीं आणि दुसरें असें कीं, नवीन

कांहीं पहावें अशी माझी मनास्थितीच नव्हती. परत येतांना कॅले, पॅरिस, जिनेवा या मार्गानें मी आलों.

ॲबरएस्टविथवर मीं एक शेवटची नजर टाकली. या गांवांत मी ४ वर्षें घालविलीं असल्यामुळें त्या गांवासंबंधीं फारच आपलेपणा वाटत होता. यापुढें हें सर्व स्वप्नवत् होणार या भावनेनें मी या गांवास शेवटचा प्रणाम केला. जुलै १९३२ च्या पहिल्या आठवड्यांत मीं इकडे येण्यास निघालों. स्टेशनवर मित्र-मंडळींनीं निरोप दिला, हस्तांदोलनें झालीं, माझ्या लॅंडलेडीनें व घरच्या मंड-ळीनीं माझी भराभर चुंबनें घेतलीं आणि ‘पुढील प्रवास सुखाचा घडो’ असे आशीर्वाद दिले गाडीनें शिटी दिली व मी तेथून लंडनला आलों. लंडन ते मुंबईचा पॅसेज मी तारेनें बुक केला होता. लंडनमधील कांहीं मित्रमंडळींची भेट गॉवरस्ट्रीटमध्यें असलेल्या वाय्. एम्. सी. ए. मध्यें झाली. वडिलांच्या निधनाच्या बातमीमुळें माझें मन मुळींच स्थिर नव्हतें. जातांना ज्या मार्गानें गेलों तसाच लंडन ते फोकस्टन व तेथून पुढें छोट्या जहाजांतून कॅले येथें पोहोंचलों. कॅले येथें माझ्या सामानाची तपासणी झाली. तेथून पॅरिस गांठलें. पॅरिस येथें दोन स्टेशनें आहेत. गारदे नॉर आणि गारदेलियं. पॅरिसहून पुढें जिनेवा बंदरावर आलों. पॅरिसला फक्त एक रात्रीचा मुक्काम केला संध्याकाळीं गार्देनार स्टेशनवर पोंहोचलों. पॅरिस बघावयाची माझी इच्छा होती. पण ती तशीच राहून गेली. मोटार ठरवून मोटारींतून संध्याकाळीं गांवांत एक चक्कर मारली. इंग्रजी भाषा येत असलेल्या स्टेशनजवळच्या एका हॉटेलांत मुक्काम ठोकला. भोजना-नंतर एक फेरफटका मारावा या उद्देशानें रस्त्यावर आलों. दहा पांच मिनिटें चालून गेल्यावर एक हिंदुस्थानी गृहस्थ भेटले. मला वाटलें, बरें झालें. गप्पा-मारण्यांत तरी वेळ जाईल. मला खरोखरच फार सुसंधि वाटली. कारण पर-देशांत आपला मनुष्य पाहिला म्हणजे मनुष्य त्याच्याशीं फार आपलेपणानें वागतो. परंतु वरील गृहस्थासंबंधीं अनुभव मात्र वाईट आला. हा हिंदुस्थानी गृहस्थ पॅरिसमध्यें कुंटिणखान्याच्या एजंटचें काम करीत होता. मी मनांत म्हटले वारे! भारतभूच्या सुपुत्रा! परदेशांत चांगला धंदा चालविला आहेस! हा गृहस्थ मला पॅरिसच्या वेश्यागृहांचीं वर्णनें सांगू लागला. रूजस्ट्रीटवर चला. तेथें तीन तीन मजली इमारती नग्न तरुण स्त्रियांनीं गच्च भरलेल्या आहेत. आंत पाऊल ठेवल्याबरोबर आंतली व्यवस्थापिका सुद्धां तुम्हांस नग्न

दिसेल. दारांतच तुमचे कपडे उतरून घेण्यांत येतील, मग तुम्हीं नंदनवनांत असल्यासारखें तुम्हांस वाटेल. मी तेथें नेऊन तुम्हांस सोडतों व परत तुमच्या घरीं मोटारींतून आणून सोडीन. मला फक्त ४० फ्रँक्स द्या म्हणजे झाले. तेथें तुम्हांस जास्त खर्च येणार नाहीं. जवळ जवळ ४० फ्रँक्स पडतील. फारच सुंदर तरुणी पसंत केलीत तर ५० फ्रँक्स पडतील एवढेंच. याठिकाणीं पॅरिस मधील मोठमोठ्या घराण्यांतील मुली सुद्धां घरून पळून येतात. अमुक मैत्रिणी-कडे ४ दिवस जाऊन येते अशा घरीं थापा देऊन या गृहांतून राहातात आणि आपली विषयवासना तृप्त करून घेतात. वगैरे सांगून तो शक्य तवढें माझें मन वळवूं लागला. हा परका गृहस्थ मला भुतासारखा वाटला. त्याला चट-दिशीं नमस्कार ठोकला व मी आपल्या हॉटेलांत येऊन विचार करूं लागलों. हेंच का पॅरिस कीं जेथें रूसोसारखे मोठमोठे क्रांतिकारक ग्रंथकार निर्माण झाले !

पॅरिसहून सकाळची गाडी गांठून जिनेवा बंदरावर गेलों. दुपारचे १२ वाजलें होते. सामानसुमान स्वतःच बोटीवर पोंचतें केलें. बोट सुटावयास तीन चार तास अवकाश होता. पोटांत कावळे ओरडूं लागले. कोठें जावें, काय खावें, आमची इंग्रजी भाषा लंगडी पडली. जिनेवा बंदराजवळ मार्केट होतें. सरळ मीं मार्केटांत घुसलों. पिकलेले १०–२० जरदाळू घेऊन खाण्याचा सपाटा चाल-विला. सर्व युरोपियन लोक माझ्या भोंवतीं उभे राहून हंसत होते. त्यानंतर एका हॉटेलांत ब्रेड आणि चहा ढोसला व बंदरावर आलों. हें बंदर दुमजली बांधलेलें आहे. मोठ्या इमारतींना जसा पोर्च असतो तसाच बंदराचा पुढचा भाग आहे. तेथून बोटीवर सहज जातां येते. माझी एस्. एस्. व्हिक्टोरिया इटालियन बोट तयार होती. मीं जाऊन माझी केबिनरूम गांठली. ही बोट पिलसना बोटीपेक्षां मोठी होती व क्रूडऑइलवर चालणारी होती. म्हणून बोटीवर धुराचें नांव नव्हतें व पिलसनापेक्षां वेगानें जाणारी होती. या बोटीवर हैद्राबादचे मि. गेही व मि. बी. रंगारेड्डी एक्साइज ऑफिसर भेटले. ते माझ्या वडिलांचे मित्र होते. वडिलांच्या निधनाचें वर्तमान त्यांना समजलें तेव्हां त्यांनाही फार वाईट वाटलें. व जिनेवा ते मुंबईपर्यंत त्यांनीं मला फारच प्रेमानें वागविलें. माझें तिकीट दुसऱ्या वर्गाचें असूनही ते मला दिवसभर आपल्या बरोबर पहिल्या वर्गांत बसवून घेत असत. वाटेंत इटलीमध्यें जावयाच्या

अगोदर व्हेसुव्हियस नांवाचा ज्वालामुखी पर्वत आम्ही दुर्बिणींतून पाहिला. श्री. रंगारेड्डी साहेबांची इच्छा पाँपेआ शहर पहाण्याची होती. त्यांनीं मला शहर बघावयास चलण्याचा आग्रह केला. परंतु मला कांहींही पहावयाचें नाहीं असें त्यांना सांगितलें. परंतु त्यांनीं मोटार ठरवून मला बळेंच शहर बघावयास नेलेंच. पाँपिया शहर पुरातनकालीं भूकंपाचे धक्के खाऊन जमीनदोस्त झालें होतें. तें शहर पुराणवस्तु-संशोधकांनीं उकरून काढलें आहे. येथील पुराणवस्तु संग्रहालय फारच पहाण्यासारखें आहे. आमच्याबरोबर कांहीं इटालियन मंडळी होती. हे लोक मोठे गानप्रिय वाटले. गेअटरवर भराभर गाणीं म्हणूं लागले. फ्रेंच लोक आणि इटालियन लोक मोठे भावनाप्रधान ! रस्त्यांतून त्यांच्या ओळखीची मंडळी भेटली कीं हे भराभर एकमेकांचीं चुंबनें घेतात आणि खूप मोठमोठयानें बोलतात. कांही इटालियन तर अगदीं आपल्याकडील पद्धतीप्रमाणें आलिंगन देतात. इटलीच्या रस्त्यावरून जात असतांना आम्हांला हिंदुस्थानांतच असल्याचा भास होई. इकडील बऱ्याच स्त्रिया केशकर्तन करीत नाहींत. येथील माणसें ठेंगू व थोडी गबाळी भासली. पाँपिया येथील वस्तुसंग्रहालयांत पुतळ्यांचाच भरणा आहे. हे पुतळे व शहर लाव्हा रसाखालीं दडल्यानंतर उत्खनन करून काढिलेलें आहे. दिवेलावणी, पंचपात्रीं वगैरे पाहून घटकाभर वाटलें कीं हिंदी संस्कृति येथपर्यंत पोहोंचली असावी. लाव्हाच्या रसांतून खरडून काढलेलें एक भलेमोठें कुत्रेंही बघावयास मिळालें. तसेंच गॅडिएटर म्हणजे पहिलवानही मुठी वळवून उभा असलेला जसाच्या तसा खणून काढून ठेविला आहे. त्याचप्रमाणें प्रसूतिवेदना होत असलेली स्त्रीही जशीच्या तशी लाव्हारसांतून काढून ठेवलेली आहे. हीं चित्रें पाहिलीं तेव्हां आमचीं मनें थरारून गेलीं. त्यानंतर आम्हीं सर्व शहर पाहिलें. मोठमोठीं जीर्ण सभागृहें, पूर्वीचीं नाटकगृहें, विलासमंदिरें व पार्लमेंटच्या धर्तीवर बांधलेली इमारत पाहिली. ग्रीक संस्कृतीचा विकास स्थापत्यशास्त्रांत केवढा झाला होता याचें प्रत्यंतर आलें. युरोपांतील आधुनिक मोठमोठया इमारती याच धर्तीवर बांधून काढलेल्या असाव्यात असें वाटतें. पाँपिया शहराच्या भरभराटीच्या कालीं येथें लिंगपूजेला महत्त्व असावें असें वाटतें. कारण तशा प्रकारचे बरेंचसें कोरीव काम येथें पहावयास मिळालें. दारूचे रांजण

व पुरातनकालचीं वेश्यागृहें पण पहाण्यांत आलीं. या खोल्यांतून स्त्रियांना जाण्याची मनाई आहे. कारण या ठिकाणीं अतिशय गर्हणीय अशीं कोरीव कामें आहेत. पाँपियामधील जुने खांब, भिंती, प्रवेशद्वारें वगैरे पाहून मनाला फारच अचंबा वाटला. मी हिंदुस्थानांतील कृष्णदेवराय यांच्या नष्टस्मृति साम्राज्याची राजधानी अनागुंदी ( हंपी ) पाहिली होती. पाँपियांतील कांहीं ठिकाणें पहात असतांना हंपीस असल्याचा भास झाला. पाँपिया पाहिल्यावर वाटेंत संगमरवरी दगडाचे पुतळे करण्याचा कारखाना पाहिला. आठवणीकरितां म्हणून येथील कांहीं वस्तु खरेदी करून आम्ही स्टीमरवर परतलों. स्टीमरनें १४ जुलै १९३२ ला मुंबई शहर गांठलें. मुंबईस बॅलार्डपीअरवर उतरलों. माझें मन फारच खिन्न झालें होतें. जातांना केवढा उत्साह वाटत होता, पण आज मी माझ्या मातृभूमीवरच एका परक्या माणसाप्रमाणें उतरलों. कारण पितृनिधनानें मला सारखें पोरका झाल्यासारखें वाटूं लागलें होतें. माझा सर्व आधार तुटला होता. मुंबईहून हैद्राबादेस मी कसा येऊन पोहोंचलों याचें सुद्धां मला भान राहिलें नाहीं.

---

## देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

### वि. स. खांडेकर

१ फुलें आणि दगड (आ. दु) १
२ घरट्याबाहेर ( ” ) ३
३ पहिली लाट ( ” ) ३
४ स्त्री आणि पुरुष ( ” ) २
५ सूर्यकमळें ( ” ) २॥
६ कालचीं स्वप्नें ३
७ आजचीं स्वप्नें ३
८ कलिका २।
९ मृगजळांतील कळ्या २॥
१० सुवर्णकण २।
११ सोनेरीसावल्या
१२ मंजिऱ्या २।
१३ सायंकाल ( आ. दु. ) २॥
१४ अविनाश १॥।
१५ मंदाकिनी १॥।
१६ कल्पलता ३
१७ आगरकर व्यक्ति आणि विचार ३॥
१८ सहा भाषणें २
१९ फुलें आणि कांटे २।
२० मराठीचा नाट्यसंसार ३
२१ हिरवा चांफा ( आ. तिसरी ) ५
२२ दोन ध्रुव ( ,, ) ५
२३ उल्का ( आ. ति. )
२४ पहिलें प्रेम ( आ. दुसरी ) ३
२५ क्रौंचवध ( ,, ) ५
२६ पांढरे ढग ( ,, ) ४।
२७ जळलेला मोहर ३

### साने गुरुजी

१ पुनर्जन्म ( आ. दुसरी ) ३
२ आस्तिक ( ,, ) ३
३ संध्या ५
४ ना खंत ना खेद ५
( कृष्णा हाथीसिंग )
५ सोन्या मारुती ! ( दु. आवृत्ति ) २
६ निळा पक्षी ( आवृत्ति दुसरी ) २॥
७ गोड निबंध ( भाग पहिला ) ३
८ गोड निबंध ( भाग दुसरा ) ३
९ गोड निबंध ( भाग तिसरा ) ३

### ग. त्र्यं. माडखोलकर

१ अवशेष २
२ व्यक्तिरेखा २।
३ माझी नभोवाणी २
४ नवे संसार ( जप्त ) ४
५ चंदनवाडी ६॥
६ नागकन्या २
७ दोन तपें ५

### ना. धों. ताम्हनकर

१ तात्या भा. १ ला (आ. दुसरी) ४
२ तात्या भा. २ रा ३
३ निवाडे भा. १ ला २॥
४ निवाडे भा. २ रा ४
५ चकमकी १॥
६ बच्चा नवरा १॥
७ अनेक आशीर्वाद ३॥
८ दाजी भा. १ ला ( आ. ति. ) ३॥

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

९ बहाणिभाऊ -।।।-
१० संतु २

## वा. म. जोशी

१ स्मृति–लहरी २
२ विचार–लहरी २।
३ विचार विहार ४।

## चिं. वि. जोशी

१ आणखी चिमणराव (आ. २री) ४
२ वायफळाचा मळा ( ,, ) ५
३ नवें भारूड २
४ स्टेशन मास्तर २
५ नटश्रेष्ठ -।।।-

## दत्तु बांदेकर

१ सख्या हरी (आ. दुसरी) २
२ नवी आघाडी १॥
३ तूं आणि मी २।
४ नजरबंदी २।

## प्र. के. अत्रे

१ साखरपुडा (आ. दुसरी) २
२ ललित वाङ्मय ३॥
३ दूर्वा आणि फुलें २।

## ना. म. पटवर्धन

१ हितपत्रें ३
२ वा. म जोशी चरित्र ४।

## द. र. कवठेकर

१ अपुरा डाव ३
२ रेशमाच्या गांठीं ३
३ आभाळाची सांवली ८

## अनंत काणेकर

१ धुक्यांतून लाल ताऱ्याकडे ३
(आ. दुसरी)
२ पिकलीं पानें (आ. दुसरी) १॥
३ उघड्या खिडक्या १॥

## काकासाहेब कालेलकर

१ ब्रह्मदेवाचा प्रवास १॥
२ भक्ति-कुसुमें ३
३ सामाजिक प्रश्न ३

## य. दि. पेण्ढरकर

१ प्रापंचिक पत्रें ३
२ घायाळ २

## ना. ह. आपटे

१ फसगत १॥
२ साजणी ५

## पु. य. देशपांडे

१ नवें जग ?– २॥

## भाई बेके

१ रॅायचरित्र– १॥

## वि. स. खांडेकर (परिचय लेखक)

१ काव्यज्योति (आ. दुसरी) १

## आनंदीबाई जयवंत

१ पारंब्या २

## रा. वि. फडतरे

१ मृगया ४

## लक्ष्मणराव सरदेसाई

१ ढांसळलेले बुरूज २

## प्रो. वि. ह. कुलकर्णी

१ व्यक्तिचित्रें २॥

## देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

### शकुंतलाबाई परांजपे
१ भिल्लिणीचीं बोरें ३

### कृष्णाबाई मोटे
१ मीनाक्षीचें जीवन २।

### र. गो. सरदेसाई
१ चलतीं नाणीं २

### संपादक आचार्य भागवत
१ वर्धा शिक्षण योजना ४।

### रा. श्री. जोग
१ सौंदर्यशोध आणि आनंदबोध ८

### त्र्यं. वि. बोकील
१ बेबीची बहीण ३

### सत्याग्रही
१ ग्रह आणि तारे- ४॥

### वि. म. भुस्कुटे
१ स्टॅलिन- ३॥
२ आई ( मॅक्झिम गॉर्की ) ७

### कमलाबाई टिळक
१ आकाशगंगा २॥

### रामतनय
१ साखरगोटी ५

### ह. रा. महाजनी
१ आपलें आर्थिक नियोजन ५

### पं. क्षमा राव
१ देणगी २॥

### गोपीनाथ तळवळकर
१ मंगल धाम ३

### श्री. किनरे
१ प्रकृति दर्शन ५

### प्रो. हॅरॉल्ड लास्की
१ राज्यशास्त्र प्रवेश २

### बाबुराव गोखले
१ वारा फोफावला २

### प्रो. एम्. एल्. दांतवाला
१ आपली राहणी १॥

### बापू गोखले
१ निवड ३

### अरविंद गोखले
१ उन्मेष २॥

### रमातनय
१ समाजजीवन ५

### बिवलकर
१ नाना पाटील चरित्र १

### एस्. एन्. आग्रवाल
१ विद्यार्थ्यांसाठीं विधायक कार्यक्रम १

### वियोगी हरी
१ अंतरीचे बोल २॥

### सौ. मालतीबाई दांडेकर
१ वज्रलेख

### कुसुमावती देशपांडे
१ मोळी २॥

### पट्टाभी सितारामय्या
१ गांधी आणि गांधीवाद ३॥

### विठ्ठलराव कोरटकर
१ माझी विलायतची सफर १॥

---

× या खुणेचीं पुस्तकें संपलीं आहेत.

## देशमुख आणि कंपनीचीं आगामी प्रकाशनें

### महात्मा गांधी

१ तेजस्वी तरुणी

### नेताजी सुभाषचंद्र बोस

१ लाल किल्ला

### वि. स. खांडेकर

१ अश्रु
२ बुद्ध आणि हिटलर
३ तिसरी भूक
४ वर्षाकाल
५ छाया भाग १–२
६ चार भिंती
७ दोन मनें (आ. ति.)
८ बडी मां
९ चक्रवर्ति
१० वटपत्रें
११ '१९४२'
१२ उद्यांचीं स्वप्नें
१३ विसावें शतक
१४ अश्रु आणि हास्य
१५ माझ्या कादंबऱ्या
१६ वालुका
१७ तृणांकुर
१८ साहित्य साधना
१९ श्यामचीं पत्रें
२० तुरुंगांतील पत्रें
२१ गडकरी (व्यक्ति आणि वाङ्मय) (दु. आ.)
२२ न लिहिलेलीं भाषणें
२३ तिसरा प्रहर
२४ चल ये राणी

### ग. त्र्यं. माडखोलकर

१ तीन दिवस
२ माझे आवडते कवि
३ चक्रवर्ति उदयन
४ कांता (दु. आ.)
५ स्वप्नांतरिता
६ ऊर्वशी
७ उमरखय्याम
८ विलापिका
९ हें युद्ध

### दत्त रघुनाथ कवठेकर

१ आपुलकीची झळ
२ ढगाआड
३ आग आणि पाणी
४ नितळलेल्या भावना

### साने गुरुजी

१ आवडत्या गोष्टी १ ते १० भाग

### गोपीनाथ तळवलकर

१ ४२ आणि नंतर

## देशमुख आणि कंपनीचीं आगामी प्रकाशनें

### ना. धों. ताम्हनकर

१ गुजाताई

२ शेजारी

३ वडिलांचे सेवेशीं

### प्र. के. अत्रे

१ 'मी' कसा झालों ?

२ ? (लघुकथा)

### कृष्णाबाई मोटे

१ अनामिकेची पूजा

२ कलाक्षेत्रांत

३ मवाली

४ गुणाची पोर

### काकासाहेब कालेलकर

१ स्मरण यात्रा

२ ? (पत्रें)

### अनंत काणेकर

१ काळे आणि पांढरे

२ गिब्रानच्या कथा

### चिं. वि. जोशी

१ गुंड्याभाऊ

२ दरबार कथा

३ लंकावैभव

४ आजीबाई

५ माणुसकी

### दत्तु बांदेकर

१ हिरवी माडी

२ कबुली जबाब

३ मोहनिद्रा

४ गडी फू

### शकुंतला परांजपे

१ चांदणी

### पां. वा. गाडगीळ

१ (?) राजकीय निबंध

### एम्. एल्. दांतवाला

१ गांधीवादाचा फेरविचार

### एस्. एम्. जोशी

१ (?) राजकीय निबंध

### अनंतराव लिमये

१ दर्यापार

### कुसुमाग्रज

१ समीधा

### प्रो. कामत

१ नवें शिक्षण

* या खुणेचीं पुस्तकें प्रकाशित झालीं आहेत.